शरत्-साहित्य माला-१०

কাশীনাথ

# काशीनाथ

[ डॉ. शरच्चंद्र चतर्जींच्या मूळ बंगालीवरून ]

শরৎচন্দ্র চট্টোপাধ্যায়

: संपादक :

**भा. वि. वरेरकर**

: अनुवादक :

**पु. बा. कुळकर्णी**

: प्रकाशक :

नवभारत प्रकाशनसंस्था, मुंबई ४.

# १

पहांटे चार वाजण्याच्या सुमारास उठून स्नान, संध्या वगैरे रोजचा कार्यक्रम संपवल्यावर शेंडीला भली उंच गांठ मारून काशीनाथ जेव्हां धनंजय भट्टाचार्यांच्या पाठशाळेबाहेरच्या व्हरांड्यांत येऊन बसत असे व दर्शन ग्रंथांतील सूत्रें व त्यावरील भाष्य गुणगुणत असे तेव्हां बाह्य जगांतील कोणत्याही गोष्टीचं त्याला भान रहात नसे. काशीनाथ बंद्योपाध्यायाचं ललाट चांगलं लांबरुंद होतं; तसाच त्याच्या देहाचा बांधाही प्रशस्त होता. दर्शनशास्त्राच्या अंतरंगांत प्रवेश करतांच तो खरोखर स्वतःस विसरून जात असे. तशा अवस्थेंत त्याला पाहून नाना प्रकारचीं माणसं त्याच्या संबंधानें नाना तर्क करीत असत. कोणी म्हणत कीं, तो आपल्या बापाप्रमाणें पंडित होणार आहे. कोणी कोणी तर असंही म्हणत कीं, आपल्या बापाप्रमाणें शिकतां शिकतां कदाचित तो वेडा बनणार आहे !

त्याला वेड लागण्याचा संभव आहे असें भविष्य वर्तविणाऱ्यांत त्याचे एक मामाही होते. कधीं कधीं ते त्याला म्हणत असत कीं, " बाबा रे, तूं गरिबाचा मुलगा, काय करायचंय तुला एवढं शिकून ? सध्यां जें कांहीं शिकला आहेस तेवढ्यावर रोज लागणारे मूठभर डाळ तांदूळ, तसंच एखादा पंचा पैरण व ताटवाटी तुला सहज मिळूं शकेल. काय करायचंय अधिक शिकून ? स्वर्गवासी पित्याप्रमाणें, घराच्या एखाद्या कोपऱ्यांत बसून व मान खालीं घालून सदासर्वदा विचारांच्या तंद्रींत तर तुला बसून रहायचं नाहीं ना ? आज जी कांहीं थोडीबहुत आशा वाटते आहे ती पुढंमागं कायम राहीलच असं नाहीं. "

परंतु या साऱ्या गोष्टी काशीनाथच्या एका कानांत शिरून दुसऱ्या कानानं बाहेर पडून जात असत.

तो वेडा होईल या भीतीमुळं त्याचे मामा सदोदित त्याला छेडित. घरांतील कामकाजांत त्याचा काडीचाही उपयोग होत नसे म्हणून संधी मिळेल तेव्हां मामी त्याला टोमणे मारून बोले. व्याकरण-साहित्यशास्त्रांत तो व्युत्पन्न झालेला पाहून मामेभाऊ त्याची थट्टामस्करी करीत; परंतु काशीनाथ कांहींएक न बोलतां एक तर हें सारं मुकाट्यानं सहन तरी करीत असे किंवा त्यांच्या बोलण्याचं महत्त्व तरी त्याला पटत नसे.

कसंही असो; या साऱ्या गोष्टींचा एकच परिणाम झाला होता. तो नेहमीं जें करीत असे, तेंच करीत राही. सायंकाळ झाली म्हणजे कधीं कधीं तो शेतांतून मनास येईल तिकडे भटकत असे. कधीं नदीच्या तीरावर असलेल्या एका जुन्या पुराण्या पिंपळाच्या झाडावरील फांदीवर बसून, अस्तास जाणाऱ्या सूर्यनारायणाची लाल लाल व पिवळट प्रभा आस्ते आस्ते आकाशभर कशी पसरली जात आहे हा देखावा पहाण्यांत तो गुंग होऊन जात असे. कधीं कधीं गांवांतील जमीनदाराच्या वाडयाजवळील शिवमंदिरांत शंकराची आरती चालू असतां तो अर्धवट मिटलेल्या डोळ्यांनीं जागच्या जागीं स्तंभित होऊन रहात असे. कधीं कधीं तर असं कांहीं एक न करतां आपल्या मामाच्या देवघरांतील अंधेऱ्या कोपऱ्यांत कांबळी टाकून त्यावर तो तासचे तास गुपचुप बसून रहात असे.

जणूं काय या जगांत त्याला कांहीं एक कर्तव्य नव्हतं, कांहीं ध्येय नव्हतें किंवा कांहीं इच्छाही नव्हती. वयाच्या बाराव्या वर्षीं त्याचे वडील निवर्तले; आतां त्याला अठरा वर्षे पूर्ण झालीं होतीं. गेलीं सहा वर्षं आपल्या मामाच्या घरीं त्यानं अशाच रीतीनं काढलीं. आपण सध्यां काय करीत आहोंत, पुढें काय करणार, पूर्वीं काय करीत होतों व यापुढं काय करणं जरूर आहे, यासंबंधींच्या विचारास त्याच्या मनांत कधींच

स्थान मिळालं नाहीं. जणूं काय सध्यां चाललंय तसंच सारं आयुष्य घालवायचं;—आयुष्यभर मामाच्याच घरीं राहून दोन वेळ पुढ्यांत पडेल तें खायचं व घरांतील माणसांचा नावडता होऊन रहायचं—जणूं काय यापुढं त्याला मामाचं घर सोडून कुठंही जावं लागणार नाहीं व कांहीं कामकाजही करावं लागणार नाहीं! जणूं काय तो शांत, नितांत अंधकारानं व्यापलेला कोपरा चिरकालपर्यंत त्याच्याच ताब्यांत रहाणार व त्याचा कब्जा घेण्यासाठीं कोणीही पुढं येणार नाहीं किंवा त्याला तेथून ओढून कोणी दुसरीकडे निघून जायलाही कधीं सांगणार नाहीं!

घराच्या आसपास रहाणाऱ्या कित्येक लोकांस त्याची दया येऊन कधीं कधीं हांक मारून ते त्याला म्हणत असत, "काशीनाथ, अशा रीतीनं वागून कधीं कुणाचं चाललं नाहीं आणि तुझंही चालणार नाहीं! जेवढं कांहीं करतां येईल तेवढं करीत जा."

काशीनाथ यावर कांहीं एक उत्तर देत नसे. तो आपल्या मनांतल्या मनांत विचार करीत असे कीं, मी असं काय करतोंय आणि मला करायचंय तरी काय?

अशा रीतीनं काशीनाथ आपल्या आयुष्यांतील दिवस कंठित होता.

# २

या गांवांतील जमीदाराचं नांव होतं प्रियनाथ मुखोपाध्याय. प्रियनाथबाबू महाकुलीन तसेच अत्यंत धनवान् होते. आपणांस सर्वगुणसंपन्न व ' कुलीन ' जांवई मिळावा म्हणून त्यांनीं सर्वत्र तपास करून पाहिला, परंतु आपण एवढे मोठे असूनही हवा तसा जांवई कांहीं मिळत नाहीं हें पाहून कुलीनतेच्या प्रथेची त्यांना भारी चीड आली होती. गृहिणीजवळ त्यांनीं ही गोष्ट काढली तेव्हां ती म्हणाली, " आमचं काय ! बोलून चालून ही एकुलती एक मुलगी आहे; कूळ पाहून काय करायचंय आम्हांला ! "

उपाध्यायांचं घर गावांतच होतं; त्यांचं मत विचारण्यांत आलं तेव्हां ते म्हणाले, " हरी ! हरी ! ! असं कधीं झालंय ! तुम्हांला पैशाअडक्यांची कमतरता नाहीं. एखादा गरीब परंतु कुलीनवंशी मुलगा पाहून त्याला कन्यादान करून घरजांवई करून घ्या. मुलगीही घरीं राहील—जांवईही घरीं राहील. दिसायलाही तें बरं दिसेल, ऐकायलाही बरं दिसेल. एवढं

मोठं घराणं, एवढं मोठं कुळ, एवढी मोठी उच्च परंपरा! तिला गालबोट लागेल असं वागून कसं चालेल?"

प्रियबाबूंनीं घरीं येतांच ही गोष्ट काढली तेव्हां त्यांची पत्नी सानंदपूर्वक संमति दर्शवून म्हणाली, "ठीक आहे; तसंच करा. आतां या जगांत माझे तरी किती दिवस राहिले आहेत? मी या जगांत आहें तोंपर्यंत माझी कमला तरी माझ्या नजरे-समोर राहील."

शेवटीं तोच विचार नक्की ठरला. एखादा गरीबाचा मुलगा पाहून त्याला मुलगी द्यायची व त्याला घरजांवई करून घ्यायचा असं ठरवून प्रियबाबू एके दिवशीं मधुसूदन मुखोपाध्याय महाशयांच्या घरीं हजर झाले. मधुसूदन शर्मा त्यावेळीं आपल्या यजमानाच्या घरीं रोजच्या पूजेसाठीं जाण्याच्या तयारीनं बाहेर पडत होते. कधीं न येणारे गावांतील भले मोठे वजनदार गृहस्थ एकाएकीं आपल्या घरीं आलेले पाहून ते गोंधळल्यासारखे झाले. त्यांना कुठं आणि कसं बसवावं, हेंच त्यांना सुचेना. प्रियबाबूंच्या हें ध्यानीं आलं. ते हंसतच म्हणाले, "आपल्याकडे तसंच कांहीं काम आहे. चला, आपण आंत जाऊन बसूं या."

"आं—होय—यावं–यावं. पण—"

"पणबिण कांहीं नाहीं! जरा स्वस्थपणें बसून सारं कांहीं बोलून टाकूं."

नंतर दोघेही चंडीमंडपांत जाऊन बसले. प्रियबाबूनींच बोलायला सुरवात केली. म्हणाले, "तुमचा भाचा कुठं आहे?"

"आणखी कुठं जाणार? त्या भट्टाचार्यांच्या पाठशाळेंत शिकतोय."

"जरा बोलवायला पाठवाल का त्याला?"

"पाठवतों ना; पण—काय काम आहे ?"

"होय. जरूरीचं काम आहे!"

ह्या काय घोटाळा आहे याचा मधुसूदनजींना कांहींच बोध होईना. त्या दळभद्या पोराशीं ह्या एवढ्या मोठ्या वजनदार गृहस्थांचं काम तें कसलं असणार? छे; कांहींच समज पडेना. जरा भीत भीतच ते म्हणाले, "कांहीं भानगड केलीय का त्यानं?"

"तो काय करणार?"

"तर मग?"

यावर प्रियबाबू हंसत म्हणाले, "त्याला माझा जांवई करायचं ठरवलंय मी. आणि आतां अर्थातच तुम्हीं माझे व्याही होणार !" एवढंच बोलून प्रियबाबू खदखदां हसूं लागले.

ज्या गोष्टीच्या स्मरणानं प्रियबाबूंना हसूं आवरेनासं झालं त्याची मधुसूदनला जाणीव झालेली असती तर ते कांहींच न बोलतां स्तब्ध राहिले असते. आश्चर्यचकित मुद्रेनें क्षणभर

त्यांच्याकडे तारवटून पाहिल्यावर भट्टाचार्य म्हणाले, " कुणाला ? आमच्या काशाला ? "

" होय ! "

" हें कसं काय बुवा ? "

" त्याच्यासारखा कुलीन मुलगा मला अद्याप आढळला नाहीं. या संबंधास विरोध आहे का तुमचा ? "

" हें काय बोलतां ? एवढं महत् भाग्य आमच्या सारख्याच्या वाट्यास कुठून यायचं ? पण तो मुलगा जरा वेडसर आहे ! "

" वेडा ? म्हणजे ? काय म्हणतां ? मी नाहीं कुठं ऐकलं ! "

" अहो ! त्याचे वडील देखील वेडे होते ! "

काशीनाथाच्या बापाला प्रियबाबू चांगले ओळखत होते; अनेक लोक त्याची वेड्यांत गणना करीत हेंही त्यांना माहीत होतं. क्षणभर विचार करून प्रियबाबू म्हणाले, " नांव काय त्या मुलाचं ? "

" काशीनाथ बंद्योपाध्याय. "

" जरा बोलवाल का त्याला ? मी एकवार पहातों तरी त्याला ! "

मधुसूदन भट्टाचार्यांनीं त्याला बोलावून आणण्यासाठीं आपल्या धाकट्या मुलाला पाठवलं. तो जाऊन लांबूनच " काशीदादा ! " म्हणून ओरडला.

काशीदादानं उत्तर दिलं नाहीं, तो मुलगा पुन्हां ओरडला—
" काशीदादा ! " यावेळीं मात्र काशीदादानं वर मान करून पाहिलं व म्हणाला, " काय रे ? "

" तुला बाबा बोलावताहेत. "

" कशाला ? "

" तें मला काय माहीत ? ते आपल्या गांवचे जमीदार बाबू आहेत ना ? ते आले आहेत. त्यांनींच तुला बोलावून आणायला सांगितलंय ! "

काशीनाथानं हळुहळु पोथी बंद केली व प्रियबाबू आणि त्याचे मामा बसले होते तिथं येऊन तो बसला.

प्रियबाबूनीं एकदां त्याला चांगलं नखशिखान्त पाहून घेतलं आणि ते म्हणाले, " कुठं गेला होतास ? "

" भट्टाचार्य महाशयांच्या पाठशाळेंत अभ्यास करीत होतों. "

" व्याकरण शिकून झालं ? "

काशीनाथ मान हालवून म्हणाला, " होय, झालं."

" साहित्य शिकला आहेस ? "

" साधारण शिकलोंय. "

" सध्यां काय शिकतो आहेस ? "

" सांख्य-दर्शन ! "

प्रिय बाबू म्हणाले, " बरं आहे; चालू दे. "

काशीनाथ तेथून निघून गेला. आपणास मुद्दाम कशासाठीं बोलावून आणलं, परत जायला कां सांगितलं, याचा त्याला कांहींच बोध झाला नाहीं.

पूर्ववत् भट्टाचार्य महाशयांच्या पाठशाळेंत येऊन काशीनाथ पोथी सोडून बसला. तो निघून गेल्यानंतर प्रियबाबू म्हणाले, " तो वेडसर आहे असं कांहींसं तुम्हीं म्हणत होतां नाहीं का ? "

मधुसूदन म्हणाले, " नाहीं; तसंच केवळ नाहीं ! पण कधीं कधीं असंच कांहीं तरी त्याचं वागणं असतं आणि म्हणून कोणी कोणी त्याला वेडा म्हणतात ! "

" असंच कांहीं तरी म्हणजे काय करतो तो ? "

" सदा सर्वकाळ पोथी—पुस्तक उघडून बसतो; नाहीं तर मनास येईल तिकडे भटकत असतो. कोणत्याही कामधंद्यांत किंवा बोलण्यासवरण्यांत त्याचं मन नसतं—असं आहे कांहीं तरी ! "

" आणखी काय करतो ? "

" कधीं कधीं अंधेऱ्या खोलींत एखाद्या कोपऱ्यांत गप्प बसून रहात असतो ! "

" आणखी कांहीं ? " प्रियबाबू हंसत हंसत म्हणाले.

त्यांच्या त्या हंसण्याचा अर्थ, अंशतः का होईना, मधुसूदन

महाशयांस समजला असावा. कांहींसे शरमल्यासारखे होऊन ते म्हणाले, " नाहीं, नाहीं ! आणखी नाहीं कांहीं ! "

" मग जरा घरांत जाऊन काय तो विचार घेऊन या ना ! त्यांचं अनुकूल मत पडलं तर या महिन्यांत कार्य उरकून घेऊं. "

घरांत प्रवेश करून मधुसूदनजींनीं आपल्या गृहिणीपुढं हा गंभीर प्रश्न ठेवला. ती तर काय, वीज पडावी त्याप्रमाणें एकदम थरारल्यासारखी झाली. आश्चर्याची मात्रा जरा कमी झाल्यानंतर ती म्हणाली, " काय ? म्हणतां तरी काय ? काशाबरोबर प्रियबाबूंच्या मुलीचं लग्न? वेडबिड तर नाहीं ना लागलं तुम्हांला ? "

" काय आहे यांत वेड लागलं म्हणायला ? "

" नाहीं ? "

" काशीनाथचं घराणं केवढं कुलीन आहे याची कांहीं आठवण नाहीं वाटतं ? "

एक दीर्घ श्वास सोडून गृहिणी म्हणाली, " म्हटलं, आमच्या हरीबरोबर नाहीं का जुळायचं ? "

परंतु ही गोष्ट घडून येणं शक्य नाहीं, याची जाणीव दोघांनाही होती. मधुसूदनजींनींही यावेळीं एक दीर्घ श्वास सोडला व म्हणाले, " बरं, त्यांना आतां काय उत्तर द्यायचं ? तुझं काय मत आहे ? "

" मत काय द्यायचं !" आत्यंतिक खिन्नतेनं गृहिणी म्हणाली, " होतंय त्याला आपण तरी काय करणार? होऊं द्या झालं!"

मधुसूदन बाहेर येऊन बळेंच हंसून म्हणाले, " ती बातमी ऐकून आमच्या कुटुंबास खूप आनंद झाला! काशीचा तिनं आपल्या मुलाप्रमाणं प्रतिपाळ केला आहे. त्याची आईच आहे म्हणाना ती. माझी बहीण वारली त्यावेळीं काशीनाथ फार फार तर दोन वर्षांचा होता असेल. त्या वेळेपासून तिनंच त्याचं लालनपालन करून त्याला लहानाचा मोठा केलं. त्यानंतर त्याचे वडील बानर्जीमहाशय इहलोक सोडून गेले, तेव्हांपासून तर त्याचा साराच भार आमच्यावर पडला आहे."

प्रियबाबू म्हणाले, " मला तें सारं कांहीं माहीत आहे! तें राहूं द्या. मला वाटतं आजच्या आज आपण कांहीं तरी निश्चित करून टाकूं!

" निश्चित काय करायचं आहे? ज्या दिवशीं आपणास सोईस्कर पडेल तो दिवस ठरवा व मला कळवा म्हणजे झालं; त्या दिवशीं येऊन मी आशिर्वाद देऊन जाईन म्हणजे झालं."

" त्यासंबंधानं नाहीं बोलत मी! कौलिन्याची मर्यादा ठरवायची ना? एवढ्या मोठ्या कुलीन घराण्याचं मोल?"

" त्यांत मी हो काय नक्की करणार? तुम्हीं जें कांहीं म्हणाल तें आम्हीं मान्य करूं. त्याबद्दल कांहीं चिंता करण्याची

जरुरी नाहीं. पण हें पहा—आपल्या भावी जामाताच्या मामीच्या—म्हणजे त्याच्या आईचाच म्हणा ना घटकाभर, जरा मानपान ठेवला पाहिजे नाहीं का ? तिला या बाबतींत विचारलं तर बरं असं वाटतं. ”

“ अहो जरूर ! जरूर ! माझं तरी तेंच म्हणणं आहे ! ”

नंतर मामीचा विचार घेण्यांत आला व प्रियबाबूंनीं मोठ्या आनंदानं कबूल केलं कीं, नवरदेवाला आईच्या ठिकाणीं असलेल्या भट्टाचार्य पत्नीला रोख एक हजार रुपये द्यायचे.

त्याप्रमाणें अंमलबजावणी करण्यांत आली. प्रियनाथबाबूंनीं त्यांत कोणत्याही प्रकारें हरकत घेतली नाहीं.

# ३

पूर्वींची स्थिति कशीही असो; परंतु आपण पद्धतशीर रीतीनं कायमचे घरजांवई झालों असं ज्यावेळीं काशीनाथला समजून आलं त्यावेळीं त्याच्या हृदयांतील आनंद कुठच्या कुठं पार मावळून गेला. आतां त्याला त्याच्या मनास येईल तिकडे जातां येत नव्हतं. कुठं तरी घटकाभर उभं रहावंसं वाटलं तर तसं करतां येत नव्हतं. वाटेल त्याच्याबरोबर मनमोकळेपणानं बोलतां येत नव्हतं. सर्व प्रकारच्या वस्तुमात्रापासून जणूं काय त्याला विभक्त करण्यांत आलं होतं. त्याच्या मनांत कुणाकडे तरी जाण्याचं आलं तर कधीं तें त्याच्या सासऱ्याला आवडत नसे तर कधीं कधीं त्याच्या सासूबाई "काय? माझा जांवई अमक्याच्या घरीं जाणार?" असं रागारागानें म्हणत असत. हा प्रकार लक्षांत आला म्हणजे जांवईबुवा जागच्या जागीं थंडगार होऊन जात असत! काय करणार? हें असं काय झालं? अशा रीतीनं एक प्रकारच्या बंधनांत आपणास कां ठेवण्यांत येत असतं? अशा रीतीनं कोणाचा कोणता उद्देश

साध्य व्हायचा आहे ? काशीनाथला यांपैकीं कशाचाही समज पडत नसे. मधून मधून मनाचं सांत्वन करण्याच्या हेतूनं तो म्हणत असे—" वाटेल तेव्हां वाटेल तें करायला किंवा वाटेल त्याच्याकडे जायला मी काय असा तसा माणूस आहें ? "

तरीपण त्याच्या हृदयाचं विवळणं चालूच होतं—स्वस्थता नाहीं ! स्वस्थता नाहीं ! हें हृदयाचं बरळणं कांहीं थांबलेलं नव्हतं.

पूर्वीं काशीनाथ कांटेरी झाडाझुडपांतून वाटेल तसा भटकत फिरत असे; आणि सध्यां काय ? आपणास सोन्याच्या पिंजऱ्यांत कोंडून ठेवण्यांत आलं आहे, एवढी गोष्ट त्याला समजत नव्हती असं नाहीं. पूर्वीं असीम, अफाट समुद्रांत वाटेल तिथं जाऊन मनमुराद डुंबण्याची व वाटेल तिकडे पोहत जाण्याची त्याला पूर्ण मोकळीक होती, तर आतां काय ? चारी बाजूनीं बांधलेल्या सीमाबद्ध अशा एका कोंदलेल्या सरोवरांत त्याला सोडून देण्यांत आलं होतं ! पूर्वींच्या अथांग सागरांत त्याला स्वच्छंदानं पोहतां येत असे किंवा वाटेल तसं पडून रहातां येत असे; तेथील तुफान व उफाळलेल्या लाटांमुळं कधीं कधीं त्याला हैराण व्हावं लागत असे; परंतु सध्याचं हें संथ सरोवर त्याला अधिक कष्टप्रद वाटूं लागलं होतं. केव्हां केव्हां त्याला वाटे कीं जणुं आपणास उकळत्या पाण्याच्या कढईंत लोटून देण्यांत आलं

आहे. सर्वांनीं एकत्र जमून, सौदा करून आपल्या देहाचा विक्रय करून टाकण्यांत आला आहे, हा देह आतां स्वतःच्या मालकीचा राहिलेला नाहीं, असेंही त्याला वाटत असे.

मस्तकावर ती पूर्वींची शेंडी नाहीं, गळ्यांत पूर्वींची ती तुळशीमाळा राहिलेली नाहीं, पूर्वींचे ते अनवाणी पाय नाहींत, तें उघडं अंग नाहीं! कुठं गेलं तें धनंजय भट्टाचार्याचं घर? कुठं गेला तो नदी किनाऱ्यावरील पिंपळाचा प्रचंड वृक्ष? आणि देवखोलीसमोरील मंडपाचा अंधेरा कोपरा आतां कुठं दिसत नाहीं तो? कांहीं—कांहीं राहिलं नव्हतं आतां!

आतां त्याचा नवा जन्म झाला होता. पूर्व जन्मांतील साऱ्या जुन्या पुराण्या वस्तु झाडून झटकून साफ करून टाकल्या आहेत. किंवा त्याच्या देहाचं व मनाचं भांडण होऊन तीं एकमेकांपासून विभक्त झालीं आहेत. सायंकाळच्या वेळीं मन जेव्हां नदी किनाऱ्याजवळील पिंपळाच्या पायथ्याशीं किंवा शेतांतून राबणाऱ्या शेतकऱ्यांबरोबर स्वच्छंदानं भटकत असायचं, त्याचवेळीं त्याचा देह बहुमोल झगझगीत कपडे परिधान करून गाडींत बसून हवा खाण्यासाठीं बाहेर पडलेला असायचा! मन जेव्हां चड्डी नेसून नदीच्या पाण्यांत खुशाल डुंबत असायचं त्याचवेळीं देह एखाद्या सुंदर मंचकावर बसून, नोकराचाकरांकडून साबण लावून घेऊन परस्पर धुतला जात असायचा!

अशा रीतीनं काशीनाथ नेहमीं एकाच वेळीं दुहेरी कामकाजांत गुंतून गेलेला असे; त्यामुळं एकही काम ठाकठीक होत नसे किंवा पूरेपूरही होत नसे !

अशा रीतीनं दिवसांमागून दिवस जात चालले होते. एक महिना, दोन महिने करतां करतां सासुरवाडीस रहायला आल्यास एक वर्ष होऊन गेलें. सुरवातीला कांहीं महिने त्याला फारसे कंटाळवाणे वाटले नाहींत. आनंदोत्सवांत, उत्साहांत व नवीनतेच्या मोहजालांत सांपडल्यामुळं, आपल्या वाट्यास आलेल्या परिस्थितींतील गुणदोष बारकाईनं पहाण्याइतका वेळच त्याला मिळाला नव्हता; आणि तो वेळ जेव्हां मिळूं लागला तेव्हां दिवसेंदिवस तो सुकतच चालला. यासंबंधींची जाणीव दुसऱ्या कुणास झाली नसली तरी कमलेस झाल्याशिवाय राहिली नाहीं. तिच्या तिखट नजरेनं नवऱ्याची मनःस्थिती अचुक हेरली. एके दिवशीं ती म्हणाली, " हें काय असं ? असे वाळलांत कां ?"

" कोण सांगतं ? "

" माझे डोळे सांगतात ! "

" साफ खोटी गोष्ट ! "

कमला हट्ट घेऊन बसली. म्हणाली, " काय होतंय तें नाहीं का सांगायचं मला ? "

" पण काय ? कुठं काय झालंय ? "

" झालंय तर ! "

" नाहींच झालेलं ! "

" खात्रीपूर्वक कांहीं तरी झालेलं आहे; मला सर्व कांहीं समजून चुकलंय ! "

काशीनाथ तोंड फिरवून म्हणाला, " तूं भारी सतावतेस मला; मी निघूनच जातों आतां इथून ! "

असं म्हणून काशीनाथ जाऊं लागलेला पाहून कमलेनं त्याचा हात पकडून धरला व भीत भीत म्हणाली, " जाऊं नका; आतां यापुढं मी कधीं कांहीं विचारणार नाहीं ! "

काशीनाथ थोडा वेळ बसला व नंतर तो उठून जाऊं लागला. कमलेनं पुन्हां बसण्याची त्याला विनंति केली नाहीं. परंतु तो निघून जातांच पदरानं तोंड झांकून घेऊन ती ओक्साबोक्सीं रडूं लागली.

काशीनाथनं बाहेर येऊन चारी बाजूस नजर टाकून पाहिलें तेव्हां आपणास कोणी पहात असल्याचं त्याला आढळून आलं नाहीं. हळूहळू दरवाजाबाहेर येऊन त्यानं रस्ता गांठला व तो मार्गक्रमण करूं लागला. बऱ्याच दूर अंतरावर गेल्यानंतर त्यानं सहज मागं वळून पाहिलं तों आपल्यामागून एक दरवान येत असल्याचं त्याला आढळून आलं. काशीनाथ त्याच्यावर एकदम चिडून ओरडला, " कुठं चालला आहेस तूं ? "

" आपल्याबरोबर ! " दरवान सलाम करून म्हणाला.

" माझ्याबरोबर येण्याची कांहीं जरुरी नाहीं. आलास तसाच जा पाहूं मागं ! "

" संध्याकाळ झाली आहे; अशावेळीं आपण एकटे फिरायला जाणार ? "

या प्रश्नाचं कांहींच उत्तर न देतां काशीनाथ चालूं लागला. अशा स्थितींत काय करावं हें बिचाऱ्या दरवानास न सुचून तो क्षणभर जागच्या जागीं खिळल्यासारखा होऊन राहिला; नंतर स्वतःच्या बुद्धीचा उपयोग करून, धन्याच्या बरोबर जाणं हेंच इष्ट होय, असं त्यानं ठरविलं. काशीनाथनं कांहीं पुन्हा मागें वळून पाहिलं नाहीं. आपल्याच विचारांच्या गुंगींत चालतां चालतां तो मामाच्या घरीं येऊन पोहोंचला. घरांत प्रवेश करून कोणाशीं कांहीं न बोलतां बाहेरच्या पडवींतील एका कोपऱ्यांत शून्यमनस्क स्थितींत तो बराच वेळ बसला होता. इतक्यांत हरिबाबू बाहेर कांहीं कामासाठीं जात होते त्यांची नजर सहज त्या कोपऱ्याकडे गेली. सायंकाळ झालेली होती; पडवींत व जिकडे तिकडे अंधकार पडूं लागला होता. दुरून कोणतीही वस्तु चांगलीशी दिसत नव्हती. जरा जवळ येऊन ते म्हणाले, " कोण आहे तें ? "

" मी तो ! " काशीनाथनं उत्तर दिलं.

हरीबाबू आत्यंतिक आश्चर्य प्रगट करून म्हणाले, " कोण म्हटलं ?—जांवईबाबू का ? "

काशीनाथ कांहीं बोलला नाहीं. तेव्हां मोठ्या आवाजांत हरीबाबू म्हणाले, " हे कोण आले आहेत, पाह्यलंस का ? जमीदारबाबूंचे जांवई आले आहेत ! त्यांना बसायला कोणी आसनसुद्धां दिलं नाहीं ! राम राम ! काय हें ! "

इतक्यांत हरीची आई बाहेर येऊन म्हणाली, " खरंच कीं ! गरीबदुबळ्या मामीची बरी आठवण झाली म्हणायची ! "

तरीही काशीनाथ कांहींच बोलला नाहीं. नंतर मामीनं आपली कन्या बिंदुवासिनी कुठं तरी जवळ पास होती, तिला मोठ्यानें हांक मारून ती म्हणाली, " बिंदू ! जरा इकडे या बाजूस येऊन तर पहा ! तुझा काशीदादा आलाय ! त्याला बसायला एखादा चटईचा तुकडा तरी आणून टाक ! तोंपर्यंत हातीं घेतलेलं काम आटोपून मी येतें ! "

बिन्दुवासिनी ही मधुसूदन मुखोपाध्याय महाशयांची दुसऱ्या नंबरची कन्या. मोठ्या कुटुंबांतील सूनबाई होऊन राहण्याचं भाग्य वाट्यास आल्यामुळं वडिलांच्या घरीं तिला सहसा येतां येत नसे. एक महिन्यापूर्वींच ती इकडे येऊन राहिली होती. आल्यापासून काशीदादाची व तिची कांहीं भेट झाली नव्हती.

काशीदादावर तिचा भारी लोभ होता. त्यामुळं त्याचं नांव ऐकतांच ती लगबगीनें धांवत आली.

येऊन पहाते तर काय ? कुठंच कोणी दिसेना ! पडवीच्या कोपऱ्यांत पडलेल्या अंधारांत कोणी तरी बसलेलं दिसत होतं. असला हा काशीदादा तिनं यापूर्वी केव्हांच पाहिला नव्हता. तो थोरामोठ्यांचा जांवई झाला आहे—थोडक्यांत सांगायचं म्हणजे तो 'बाबू' झाला आहे—हें लक्षांत येऊन तिला हसूं आलं. परंतु ती जवळ गेली तेव्हां अंधारांतही दादाचं मुखकमल इतकं काळवंडलेलं दिसलं कीं, बाहेर फुटूं पहाणारं हास्य जागच्या जागीं दबलं गेलं ! काशीनाथचा तशा प्रकारचा उदासवाणा चेहरा तिनं यापूर्वी केव्हांही पाहिला नव्हता. त्या एवढ्या घरांत तीच काय ती काशीनाथला थोडीतरी ओळखूं शकत होती. जवळ येऊन स्नेहपूर्वक त्याचा हात धरून ती म्हणाली, "काशीदादा ! इथं एकटाच बसून काय करतोयस रे ! चल पाहूं, खोलींत जाऊन दोन घटका बोलत बसूं या तरी !"

काशीनाथ बिन्दूच्या खोलींत येऊन तेथील चटईवर बसला.

बिन्दू म्हणाली, "काशीदादा ! इतके दिवस झाले इकडे येऊन मला ! इथं येऊन या गरीब बहिणीला भेटून जायला एखादा दिवस सुद्धां मिळाला नाहीं तुला ?"

"यायला मिळालं पाहिजे ना अक्का !"

" कां नाहीं यायला मिळालं ? "

काशीनाथ जरा अळंटळं करीत म्हणाला, " देत नाहींत ना यायला ! "

" यायला देत नाहींत ! म्हणजे ? "

" तसंच आहे तें !" काशीनाथ आत्यंतिक खिन्नतेनं म्हणाला.

" वाटेल तिकडे तुला जाऊं देत नाहींत का ? " बिन्दू कळवळून म्हणाली.

" नाहीं; नाहीं ना जाऊं देत ! मी कुठं वाटेल तिकडे जाऊं लागलों तर आमच्या सासरेबुवांना तें अपमानकारक वाटतं ! "

या सर्व गोष्टी उघड करून सांगतांना काशीनाथला भारी दुःख होत आहे हें ती समजून चुकली; त्यासाठीं विषयांतर करून ती म्हणाली, " दादा ! अजून तुझी बायको नाहीं दाखवलीस मला ! "

काशीनाथ गप्प राहिला.

" कशी काय आहे रे तुझी बायको ! "

" चांगली आहे ! "

" तर मग एखादे दिवशीं मीच येऊन तिला पाहून जाईन. "

काशीनाथानें वर मान करून बिन्दूच्या तोंडाकडे पाहिलं; नंतर मंद हास्य करून तो म्हणाला, " अवश्य ये ! "

इतक्यांत खाड् खाड् आवाज करीत एक गाडी दरवाजासमोर

येऊन उभी राहिली. बिन्दू म्हणाली, " तुझी गाडी आलेली दिसते ! "

" होय ! " तिथून जातां जातां तो म्हणाला, " कधीं येशील ग तूं ? "

" कुठं ? "

" आपल्या वहिनीला पहायला ! "

ओठावर येऊं पहाणारं हास्य ओठांतल्या ओठांत दाबून ती म्हणाली, "तुला सवड होईल तेव्हां तूंच येऊन मला घेऊन जा."

" उद्यांच येऊं का ? "

" ये ना. "

दुसऱ्या दिवशीं काशीनाथ गाडी घेऊन स्वतःच आला. त्याच्याबरोबर बिन्दू बाहेर पडणार होती, तोंच तिथें हरीबाबू कुठून तरी येऊन दाखल झाला. येतांना गाडी त्याच्या दृष्टीस पडली; त्यावरून काशीनाथ आला असावा असं अनुमान त्यानं बांधलं. घरांत प्रवेश करतांच बिंदू चालली आहे तरी कुठं म्हणून चौकशी करतां आई म्हणाली, " आपल्या वहिनीला भेटायला जात असेल रे ती ! "

" कुठल्या वहिनीला ? त्या जमीदाराच्या मुलीला ? "

आईनें यावर कांहींच उत्तर दिलं नाहीं. तेव्हां हरीबाबू मोठ्या गांभीर्याचा आव आणून म्हणाला, " बिंदू तिकडे गेली तर या जन्मीं मी तिचं तोंड पहाणार नाहीं. "

आईला आश्चर्य वाटलं. ती म्हणाली, “ कांहीं तरीच काय बोलतोस रे ? भावाच्या बायकोला पहायला गेली तर त्यांत काय बिघडलं ? ”

“ त्यांत काय बिघडलं तें तुला सांगायला आतां मला वेळ नाहीं ! बिन्दूनं माझं सांगणं ऐकलं नाहीं तर पुनरपि या घरांत तिला पाऊल टाकायला मिळणार नाहीं एवढंच मी सांगून ठेवतों ! ”

हरीदादा कसल्या प्रकारचा माणूस आहे हें बिन्दू बरोबर जाणून होती. कांहीं एक न बोलतां ती खोलींत गेली व तिनें आपला साजशृंगार उतरून ठेविला. काशीनाथनं उभ्या उभ्या हा सर्व प्रकार पाहिला व कांहीं न बोलतां तोही निमूटपणें गाडींत जाऊन बसला.

संध्याकाळीं कमलेनं विचारलं, “ हें काय ? वन्सं आल्या नाहींत त्या ? ”

काशीनाथ ओशाळून म्हणाला, “ त्यानीं पाठविलं नाहीं तिला ! ”

“ कां ? ”

“ कुणाला ठाऊक ? इकडे पाठवायला त्यांना लाज वाटत असावी ! ”

ते शब्द कमलेच्या हृदयास झोंबतच गेले.

# ४

कमला ही जमीदार प्रियबाबूंची एकुलती एक मुलगी होती. प्रियबाबूंचीं यापूर्वीं दोन लग्नं झालीं होतीं. परंतु त्यांना मुलबाळ कांहींच झालं नव्हतं. त्या दोघीही मृत्यु पावल्या तेव्हां दुःखाच्या भरांत त्यांनीं म्हातारपणीं तिसरा संसार थाटला. त्याचं फळ म्हणजे ही एकुलती एक मुलगी.

संततीचा सर्वस्वीं अभाव असलेल्या घरांत मूल जन्मास आलं तर मुलगा व मुलगी या भेदभावास जागा रहात नसते. त्यामुळं कमला ही घरांतील मालकीणीपेक्षांही मालकीण व गृहिणीपेक्षांही गृहिणी होऊन राहिली असल्यास नवल नाहीं. ती कांहींही म्हणो; त्याला विरोध करणारं किंवा तिचा शब्द न मानणारं साऱ्या घरांत कोणीही नव्हतं. तिच्या विरुद्ध जाण्याची कुणाची ताकदच नव्हती! कमला धनवान्, विद्वान्, रुपवान्, गुणवान्—सर्व कांहीं होऊन राहिली होती. सर्व बाबतींत तीच घरची कर्ती होती; असें होतें तरीही एका माणसास मात्र ती ताब्यांत आणूं शकली नव्हती; आणि ती व्यक्ति म्हणजे तिचे पतिराज!

कमलेनं नाना प्रयत्न करून पाहिले; रागावून रुसून पाहिलं, रडून पाहिलं, अभिमानानं व ताठ्यानं वागून पाहिलं, आदरानं व मानसन्मानाच्या भावनेनं वागून पाहिलं—तरीही पतीचं मन कांहीं तिला कांहीं केल्या काबूंत आणतां आलं नाहीं. मन काबीज करणं दूरच राहिलं, परंतु तिला त्याच्या जवळपासही बैठक मांडतां आली नाहीं.

बोलून चालून एक दरिद्री माणूस, परंतु केवढा मोठा तोरा घेऊन तो तिचा पति होऊन आला होता, हेंच तिला कळेना. रोजच्या रोज नित्य नेमानं दोन वेळां ती प्रार्थना करीत असे कीं, " हे भगवन्, त्यांचं मन माझ्या आटोक्यांत येईल असं कर. " कधीं कधीं तिला वाटत असे कीं, त्यांना मनच नाहीं. मग तें आटोक्यांत तरी कसं येणार ?

आपला पति म्हणजे कधींही न सुटणारं एक गुंतागुंतीचं कोडंच आहे असं तिला वाटावं. जसजसे दिवस लोटूं लागले तसतसं तें कोडं सुटण्याऐवजीं अधिकाधिक गुंतागुंतीचं होऊं लागलं. कधीं कधीं तिला वाटे कीं पतीचं एवढं प्रेम कोणाही स्त्रीला कधीं लाभलं नसेल; याच्या उलट कधीं कधीं असंही वाटे कीं, अशा प्रकारची आत्यंतिक उपेक्षा कधीं काळीं कोणत्याही स्त्रीच्या वाट्यास आली नसेल.

कसेंही असो, कमलेच्या आयुष्यांतील दिवस कसेबसे जात

चालले होते. जात नव्हते काशीनाथचे. पोथी, पुस्तक काढून वाचावं तर लक्ष लागत नसे. कुठं तरी स्वस्थ बसून रहावं तर तसंही करवत नसे. गप्पा गोष्टी करण्यांत किंवा मौज मजा करण्यांत वेळ घालवावा तर त्यांतही गोडी वाटत नसे. एवढं मोठं धष्टपुष्ट शरीर, परंतु तें कृश होण्याच्या मार्गास लागलं होतं! एवढी तेजस्वी कांति, परंतु तीही अलीकडे काळवंडूं लागली होती.

आस्ते आस्ते काशीनाथ रोडावूं लागला आहे हें लक्षांत येऊन कमला कपाळावर हात मारून घेऊं लागली. या बाबतींत कांहीं एक विचारपूस करायची नाहीं, अशी तिनं प्रतिज्ञा केली होती. परंतु आतां ती प्रतिज्ञा पाळणं तिला अशक्य झालं. पतिराज बाहेर गेले होते ते येतांच त्यांच्या पायांवर घालून घेऊन ती रडूं लागली. एकाएकीं हें असं काय झालं असं वाटून काशीनाथ घाबरला व तिचा हात धरून तिला वर उठविण्याचा प्रयत्न करूं लागला. ती त्याच्या पायांना एवढ्या जोरानं बिलगून राहिली कीं, तिला वर उठविणं त्याला शक्य झालं नाहीं.

"हें काय असं? झालं तरी काय? रडण्यासारखं असं काय झालं?"

कमला कांहींच बोलली नाहीं. तिचं रडणं जोरजोरानं चालूच होतं. नंतर कांहीं वेळानं पायावर मस्तक ठेऊन ती

म्हणाली, " एकाच फटक्यासरशीं मला एकदम मारून तरी टाका; असे कणाकणानं माझा जीव कां घेतां ? "

काशीनाथाला आश्चर्य वाटलं. तो म्हणाला, " कां ? काय केलं मी ? "

" तें काय तुम्हांला माहित नाहीं ? "

" मुळींच नाहीं. "

" बाकी काय वाटेल तें करा; पण या जगांत मला उभं रहातां येईल एवढी तरी जागा द्या ! "

कमलेला वर उचलून घेतां आलं तेव्हां तिच्या अगदीं जवळ बसून तो प्रेमानं म्हणाला, " काय झालंय ? काय असेल तें मला सरळ सरळ सांग. "

" दिवसेंदिवस तुमची प्रकृति अशी खालावत कां चाललीय ? "

" खरीच का माझी प्रकृति इतकी एकदम खालावलीय ? "

कमला डोक्यावर पदर घेऊन स्फुंदस्फुंदून रडत होती. त्याच स्थितींत मान हालवून तिनं उत्तरादाखल होकार दिला.

" मलाही वाटतं कीं, मी अलिकडे अगदी खंगत चाललोंय— पण मी तरी काय करूं ? तूंच सांग ! "

कमला वर मान करून म्हणाली, " काय करूं म्हणजे ? कांहीं तरी औषधपाणी ध्या ! "

काशीनाथला तशा स्थितींतही हसूं आल्याशिवाय राहिलं नाहीं. तो म्हणाला, " औषधानं नाहीं गुण येणार ? "

" मग कशानं ? "

" तें कांहीं कळत नाहीं मला ! "

" औषधानं गुण येणार नाहीं; आणखी कशानं बरं वाटेल, तेंही सांगतां येत नाहीं; मग काय, माझ्या कपाळावर एकदां कायमची धोंड घालायचीय ? "

काशीनाथ साधासुधा माणूस—संस्कृत पाठशाळेंत जाऊन त्यानं विद्या संपादन केली होती, प्रेमाची बोली त्याला माहित नव्हती. तरीही यावेळीं स्वाभाविक स्नेहभावनेच्या जाणिवेनं त्याचं मन व्याकूळ झालं. कमलेचे हात धरून तिचे डोळे पुसून तो म्हणाला, " इथं बरं वाटत नाहीं मला—त्यामुळं हा असा झालोंय ! "

" मग राह्यलांत कशाला इथं ? "

" नको राहूं तर जाऊं कुठं ? "

" या जागेशिवाय जगांत राह्यला दुसरीकडे कुठं जागाच नाहीं का तुम्हांला ? जिथं सुख वाटेल तिथं जाऊन रहावं ! "

" तें होणं नाहीं ! "

" कां नाहीं ? "

" मी इथं राहिलों नाहीं तर तुझ्या वडिलांना कसं बरं वाटेल ?"

" आणि इथं राहून दिवसेंदिवस असे खंगत चाललां तर तें त्यांना बरं वाटेल का ? "

" नाहीं; पण याला उपाय काय ? तुझ्या वडिलानीं गरीबसा माणूस पाहून—"

त्याच्या तोंडावर हात ठेऊन कमला म्हणाली, " नको ! नको ! तसं कांहीं बोलूं नका ! मोकळेपणानं मला काय तें सांगून टाका पाहूं; मग कांहीं तरी तोड काढतां येईल. "

कांहीं वेळ विचार केल्यासारखं करून काशीनाथ म्हणाला, " साऱ्याच गोष्टी मोकळेपणानं तुझ्याशीं बोलतां येणार नाहींत." पुन्हां क्षणभर थांबून तो म्हणाला, " हें सर्व पाहून व ऐकून मला म्हणावंसं वाटतं कीं, आपलं लग्न झालं नसतं तर फार चांगलं झालं असतं."

" कां ? "

" तूंच सांग पाहूं, माझ्याशीं विवाह झाल्यापासून तुझा एक दिवस तरी सुखांत गेलाय का ? मला श्रृंगार कळत नाहीं—प्रेम कळत नाहीं—तसं पाहिलं तर मला कांहींच कळंत नाहीं. या वयांत तूं किती तरी आवडी-निवडी धरल्या असशील --पण त्या मला मुळींच पुरवतां आल्या नाहींत. मी तुझा नवरा नव्हें—नवऱ्याची सांवली आहें."

कमलेच्या नेत्रांतून घळ घळ अश्रुप्रवाह सुरू झाला होता.

आपले पतिराज काय बोलताहेत याचंही तिला बरोबरसं आकलन झालं नाहीं. आतांपर्यंत एक गोष्ट तिच्या अंतःकरणांत खळबळ माजवून राहिली होती व बाहेर पडण्यासाठीं एकसारखी धडपडत होती. एखाद्या हवा नसलेल्या खोलींत कोंडून बंद करून ठेवावं तसंच तिला झालं होतं. जबरदस्त ओढाताण करून एकदम बाहेर निसटून आल्याच्या आवेशानं कांपऱ्या आवाजांत तिनं विचारलं, " काय ? मी आवडत नाहीं का तुम्हांला ? "

" तें सांगेन कधीं तरी ! आजच काय त्याचं ? "

" नका सांगूं वाटल्यास. पण माझ्याशीं लग्न करून तुम्हीं सुखी झालां नाहीं का ? "

" कुणी सांगावं ! नसेलही."

" दुसऱ्या कुणाबरोबर तरी लग्न करून सुखी झालां असतां का ? "

" तेंही सांगतां यायचं नाहीं. "

हें उत्तर ऐकून कमलेच्या सर्वांगाची लाही झाली.

इतक्यांत एक मोलकरीण दरवाजाजवळ उभी राहून म्हणाली, " बाईसाहेब ! आईसाहेबांना ताप आलाय—त्या हांक मारताहेत आपल्याला ! "

डोळे पुशीत पुशीत कमला बाहेर निघून गेली.

## ५

आईला आलेला ताप कांहीं केल्या उतरला नाहीं. पंधरा दिवस त्या दुःखांत काढून व सर्वांना दुःखांत लोटून तिनं प्राण सोडला.

पत्नीचा वियोग प्रियबाबूंना भारीच जाणवला. आधींच म्हातारपण त्यांत आणखी या दुःखाची भर पडली. या जगांत आतां आपणासही फार दिवस काढावे लागणार नाहींत हें ते समजून चुकले होते. अशा परिस्थितींत कमलेवरील कामाकाजाचा भार वाढला. आपलं पुढं काय होणार याची काळजी करायची करून शिवाय घरांतील एकंदर कामाकाजाचा भारही तिला वहावा लागत असे. वडिलांचं म्हातारपण, शिवाय आस्ते आस्ते त्यांची क्षीणता वाढत चाललेली, त्यामुळं कमला दिवसांतील बहुतेक सारा वेळ त्यांच्याचजवळ काढूं लागली.

आणि काशीनाथ ? त्याला या जगाशीं काय करायचं होतं ? वेळप्रसंग ओळखून आपल्या आवडीचीं कांहीं पुस्तकं घेऊन

आपल्या खोलींत दरवाजा बंद करून तो बसत असे. पुस्तकांत अगदींच मन रमेनासं झालं म्हणजे तो घराबाहेर पडत असे. एकदां बाहेर पडून गेल्यानंतर तो कधीं कधीं एक एक दोन दोन दिवस परत घरीं येतच नसे. कुठं जेवणखाण करीत असे, कुठं झोपत असे, हें कुणालाही समजत नसे.

हें सर्व प्रत्यक्ष पाहून व ऐकून कमला एकप्रकारें हताश झाली होती. तिनं अलिकडे त्याची आशा सोडून दिली होती. स्त्री असली तरी अद्याप ती पोरसवदाच होती. पतिप्रेम, पतिभक्ति म्हणजे काय, या संबंधाची तिला जाणीव झालेली नव्हती. तें शिकण्याचा ती प्रयत्न करीत होती—तोंच विघ्न आलं !

आणि हें विघ्न पतीकडूनच उपस्थित झालं होतं. तिचा तरी काय दोष ? ती जें कांहीं थोडंबहुत शिकली होती त्याचाही आस्ते आस्ते तिला विसर पडूं लागला. तिच्या हृदयांत सोनेरी रेषा नुकती कुठं उमटूं लागली होती—ती अद्याप उज्वल झाली नव्हती; बाह्य सौंदर्याचं प्रतिबिंब अद्याप अंतरंगांत उमटूं लागलं नव्हतं. अनास्थेमुळं व बेदरकारीमुळं ती रेषा सुस्पष्ट होण्याऐवजीं आस्ते आस्ते नामशेष होण्याच्या मार्गास लागली—आणि शेवटीं जेव्हां तिचा कांहीं मागमूसही राहिला नाहीं तेव्हां हें कसं घडलं व काय झालं याचा तिला पत्ता लागला नाहीं.

एखाद्या कोसळून पडलेल्या इमारतींच्या एकदोन विटा, एकदोन तावदानें, चौकटी असं कांहीं ना कांहीं साहित्य हृदयांत इकडे तिकडे अस्ताव्यस्त पडलेलं होतं. कधीं कधीं तें नजरेला येई; पण तें सर्व गोळा करून त्याची इमारत उभारावी अशी इच्छा तिला केव्हांही होत नसे—आणि तेवढं सामर्थ्यही आतां तिला राहिलं नव्हतं. एकाकाळीं याच ठिकाणीं एक सुंदर ताजमहाल बांधला जात होता. आनंदवन बहरत होतं. स्वप्नाच्या गुंगींत तें सारं अस्पष्ट दिसत होतं. स्वप्न विसरून जातांच सर्व नाहींसं झालं. तें नयनमनोहर स्वप्न पुन्हां आपल्या वाट्यास यावं, पुन्हां तें डोळे भरून पहावं, अशी इच्छाहि आतां तिच्याठायीं राहिली नव्हती. जें गेलं तें गेलं !

वृद्ध वडिलांची सेवासुश्रुषा करण्यांत, नोकर चाकरांवर देखरेख ठेवण्यांत व अशाच प्रकारच्या कर्तव्यपालनाच्या सुखांत मनाचं समाधान करून घेण्यांत तिचे दिवस जात होते. एकाला ज्यांत सुख वाटतं त्यांत दुसऱ्यालाही सुख वाटेलच असं म्हणतां येणार नाहीं. ज्या गोष्टींत कमलेला सुख वाटत होतं त्याच गोष्टींमुळं तिच्या म्हाताऱ्या दाईच्या जिवाला टोंचण्या लागल्या होत्या. तिच्यानं रहावेना, तेव्हां कोणालाही जाग लागूं न देतां एक दिवस ती प्रियबाबूजवळ हळूच जाऊन म्हणाली, "जांवईबाबू अलिकडे कांहीं तरीच झाले आहेत ! घरीं येतात

कधीं, बाहेर जातात कधीं, कुठं काय करतात, याची घरांत कुणाला कांहींच खबर नसते. ताईसाहेबांशीं बोलतसुद्धां नाहींत वाटतं ! ''

" स्वतःच्या शारीरिक व मानसिक त्रासांना प्रियबाबू कंटाळून गेले होते. त्यांना इतर गोष्टींकडे लक्ष द्यायला सवड नसे. वृद्ध दाईनं सांगितलेली गोष्ट ऐकून त्यांचे डोळे खाड्कन् उघडले. कमला जवळ येऊन बसतांच ते स्नेहपूर्वक म्हणाले, " मी विचारीन त्या प्रश्नांचीं उत्तरं सरळ देशील ना पोरी ? ''

आपल्या पित्याच्या तोंडाकडे पहात कमला म्हणाली, " कसला प्रश्न बाबा ! ''

" हें बघ बाळ ! माझ्यापाशीं लाजायची कांहीं जरुरी नाहीं ! आणि बापापासून कोणतीही गोष्ट लपवून ठेऊं नये. काय असेल तें सारं मला मोकळेपणानं एकदां सांगून टाक. मी सारं कांहीं मिटवून टाकीन. ''

कमला कांहींच बोलली नाहीं. प्रियबाबू पुनः म्हणाले, " तूं सुखासमाधानानं रहावं म्हणून हें स्थळ मी शोधून काढलं. तुझ्याशिवाय या जगांत मला दुसरं कुणीच नाहीं. तूं दुःखांत असलेली पाहून मी प्राण सोडला तर मला गति मिळणार नाहीं. '' बोलतां बोलतां म्हाताऱ्याच्या डोळ्यांतून घळघळ अश्रुप्रवाह सुरू झाला. कमलेचे डोळेही ओले चिंब

झाले होते. आपल्या हातानं तिचे अश्रू पुसून टाकून प्रियबाबू म्हणाले, " मनमोकळेपणानं जें कांहीं असेल तें नाहीं का सांगणार मला ? "

परंतु काय सांगावं हेंच कमलेस समजेना. क्षणभर स्तब्ध राहून पुन्हां प्रियबाबू म्हणाले, " भांडला आहांत वाटतं ? "

कमलेला वाटलं, झगडा केव्हां व्हायचा ? प्रेम असेल तरच ना ! ती मान हालवून म्हणाली, " तसं कांहीं नाहीं ! "

" भांडण झालं नाहीं ? मग काय तूं त्यांना आवडत नाहींस ? "

" होय ! तसंच कांहीं आहे ! " असं उत्तर देऊन टाकावं असं एकदां कमलेला वाटलं; परंतु त्यावेळीं तिनं कांहींच उत्तर दिलं नाहीं. पतीला मी आवडत नाहीं असं सांगावं हा विचार मनांत येतांच तिच्या मनावर केवढा तरी आघात झाला ! ती कांहींच बोलली नाहीं.

खिन्नतेनं मृदु हास्य प्रगट करून प्रियबाबू म्हणाले, " मग काय ? तुलाच तो आवडत नाहीं का ? "

यावेळीं कमलेला वाटलं, म्हणावं, ' होय—मलाच नाहीं आवडत ! ' पण हें काय बोलतां येतंय ! माझा नवरा मला आवडत नाहीं म्हणूं ?

कमला थरारली. अंतरंगाच्या तळाचा ठाव घ्यायचा तिनं

प्रयत्न केला. तिथलीं सारीं गीतवाद्यं बंद पडलीं होतीं. मधून मधून कुणी तरी त्यांतलीं कांहीं इकडे तिकडे सरकावून ठेवीत होतीं किंवा उचलून नेत होतीं. त्यांच्या हातच्या वाद्याला नकळत कुठं धक्का लागतांच एकादा सूर निघत असावा. तो ऐकून कुठून तरी एखादा नट असाच डोकावून पाहून जात असावा—तसंच कांहींसं झालं होतं.

दुःखावेग अनावर होऊन कमलेनं आपले डोळे पदरानं झांकून घेतले.

प्रियव्राबू अधिकच घोटाळ्यांत पडले. म्हणाले, " रडतेयस कां पोरी ? "

" आम्हीं जशीं कांहीं त्यांचीं कुणीच नव्हे, असं वाटतं त्यांना ! "

प्रियबाबूनीं आस्ते आस्ते पुढं सरकून मुलीस आपल्या जवळ ओढून घेतलं व हळूच म्हणाले, " छे छे ! असं कांहीं बोलूं नये ! जिच्या पोटीं तूं जन्म घेतलास ती माझं सर्वस्व होती. अजूनही रोज रात्रीं माझ्या पायांजवळ येऊन ती बसत असते—केवळ तुझ्या भीतीनं दिवसा येत नाहीं कधीं ! संध्याकाळ झाली म्हणजे ती येते. तिनं येऊन तुझं हें भाषण ऐकलं तर तिच्या जिवाला किती जाणवेल हें दुःख ! "

आणि संध्याकाळ व्हायची आतां कांहीं राहिली नव्हती.

खोलींत सर्वत्र अंधकार पडूं लागला होता. खरोखरच खोलींत कुणी तरी आलं कीं काय म्हणून कमलेनं आश्चर्यानं चारी बाजूंना पाहिलं! कुठंच कोणीही दिसलं नाहीं हें पाहून तिला जरा धीर आला.

तिथून ती बाहेर आली तेव्हां तिचे पाय थरथर कांपत होते. सारं शरीर इतकं कांहीं दुर्बल झालेलं वाटूं लागलं होतं कीं, शरिरांतील अर्धं अधिक रक्त कोणी तरी शोषून घेतलं असावं असा तिला भास झाला! आपलं काम काज संपल्यावर ज्या खोलींत काशीनाथ बत्ती लावून जमिनीवर आसन ठोकून आपली पोथी उघडून बसला होता, त्या खोलींत येऊन ती बसली. काशीनाथनं मान वर करून पाहिलं तों समोर कमला!

" तूं का ? " आश्चर्यानं काशीनाथनं प्रश्न केला.

" होय—मी आलेंय! "

" बैस! " एवढंच बोलून काशीनाथनं पुनरपि आपलं लक्ष हातांतील पोथीकडे वळवलं.

तो पोथी वाचीत बसला असतां कमला बराच वेळपर्यंत बसून राहिली होती. नंतर हात पुढं करून तिनं त्याच्या पुढ्यांतील पोथी बंद करून टाकली.

आश्चर्य वाटून काशीनाथ म्हणाला, " पोथी बंद करूनशी टाकलीस ? "

" दोन शब्द बोला ना ! वाचन रोजच्या रोज चाललंच आहे ! एखादे दिवशीं जरा थोडं वाचलं तर कांहीं बिघडायचं नाहीं ! "

" एवढ्यासाठींच का पोथी बंद करून टाकलीस ? "

" तेवढयासाठींच नाहीं; तुम्हीं जरा तरी चिडून माझ्यावर रागवावं, मला टाकून बोलावं म्हणून बंद करून टाकली ! "

" कशासाठीं तुझ्यावर रागावूं मी कमला ? " काशीनाथ उगीच थोडं हंसून म्हणाला, " तुझ्यावर कधीं तरी रागावलों आहे का मी ? तूं कधीं बोलत नाहींस, माझ्या जवळपास येत नाहींस, मग पुस्तक वाचीत बसूं नको तर सारा दिवस मी कसा घालवूं ? तूंच सांग पाहूं ! अलिकडे ताप येतोय मला. गेल्या दोन दिवसांपासून मी कांहीं एक खाल्लं नाहीं, तरीसुद्धां तूं कधीं माझी विचारपूस केली नाहींस. "

कमलेनं मान वर करून पाहिलं तो आपल्या पतीचं तोंड साफ सुकून गेलं असल्याचं तिला दिसून आलं. कपाळाला हात लावून पाहिलं तों तें तिला गरम लागलं. तिला एकदम रडूं आलं व तशीच ती पतीच्या मांडीवर पडली. लाजेनं व दुःखानं यावेळीं मरण येईल तर बरं असं तिला वाटलं. रडत रडत ती म्हणाली, " माझे सारे अपराध विसरून जा आणि पुन्हां एकवार मला आपल्याजवळ घ्या. तुमचा सारा भार माझ्यावर टाका."

। " माझी कांहींच हरकत नाहीं भार टाकायला—पण तो उचलतां येईल का तुला ? "

" कां उचलतां येणार नाहीं ? "

" पाहूं या ! "

" मला घ्याच तुम्हीं ! "

" तुला पुष्कळ वेळां घेण्याचा प्रयत्न केला, परंतु कांहीं केल्या तुझा समजच पडत नाहीं; आणि कदाचित्—अजूनही तुझा समज पडेल अशी मला आशा नाहीं. "

दिव्याच्या प्रकाशांत तें मुखकमल जितकं दृष्टीस पडलं तितकं तिनं डोळे भरून पाहून घेतलं. क्षणभर तिला भास झाला कीं, त्या मुखकमलावर राखेखालीं गडप झालेला अग्नी पेटतोय—मेणांत गडप झालेला किती तरी मध तिथं जमा होऊन राहिला आहे ! क्षणभर ती बेभान झाली. एकदम आवेशांत येऊन ती म्हणाली, " मग इतके दिवस कां मला आपली ओळख होऊं दिली नाहीं ? स्वतःस छपवून ठेऊन इतके दिवस कां मला आपण दुःख दिलं ? "

आनंदाच्या भरांत कमलेनं आपल्या पतीच्या गळ्यांत गळा घातला. काशीनाथच्या भारावलेल्या डोळ्यांतूनही त्यावेळीं घळघळ अश्रुप्रवाह सुरू झाला !

# ६

दुसऱ्या दिवशीं काशीनाथला बोलावून आणून प्रियबाबू म्हणाले, " बाबा रे, मी आतां फार थोड्या दिवसांचा सोबती आहें. मला एका मुलीशिवाय दुसरं कोणी नाहीं हें तूं जाणतोस. माझी जी कांहीं मालमत्ता किंवा संपत्ति आहे ती सारी तुम्हां दोघांनाच देऊन जाणार आहें. तेव्हां मी या जगांत जे थोडे दिवस आहें तोंपर्यंत सर्व समजून घेतल्यास बरं—नाहींपेक्षां कांहीं एक हातास लागणार नाहीं. दुसरे कुणी तरी येऊन तुम्हांला फसवून सारं घेऊन जातील ! "

आदरपूर्वक खालीं मान वाकवून काशीनाथ म्हणाला, "जशी आपली आज्ञा ! "

प्रियबाबू म्हणाले, " आज्ञा आणखी कसली करणार ? उद्यांपासून सकाळीं थोडा वेळ जरा आपल्या कामकाजाच्या कचेरींत जाऊन बसत जा ! "

" आपल्या आज्ञेप्रमाणें जरूर करीन. " असं म्हणून काशीनाथ तेथून गेला.

नंतर आपल्या कन्येस बोलावून प्रियबाबू म्हणाले, "बाळ! मी आतां थकलोंय; एवढ्या मोठ्या मिळकतीवर देखरेख ठेवण्याचं व व्यवहार पहाण्याचं काम आतां माझ्याकडून होईनासं झालंय. तेव्हां मी आतां सारा भार काशीनाथवर सोंपवून दिलाय. माझ्यामागं कोणत्याही प्रकारं त्याच्या मार्गांत अडचण उपस्थित होऊं नये म्हणून मी आहें तोंपर्यंत त्याला मधून मधून योग्य ती सल्लामसलत देत राहीन."

त्याप्रमाणें कित्येक दिवसपर्यंत कचेरींत जाऊन प्रियनाथबाबू जमीदारीसंबंधानं जरूर ती माहिती काशीनाथला करून देऊं लागले. आपल्यावर कांहीं ना कांहीं काम सोंपविण्यांत आल्यामुळं त्यालाही एक प्रकारचं समाधान वाटूं लागलं. जमीदारांच्या घरांत जी असमाधानाची ठिणगी तेवूं लागली होती, कितीतरी दिवसांनीं ती आतां हळुहळू विझायची सुरवात झाली.

काशीनाथ नियमीतपणें कचेरींतील कामकाज पाहूं लागला. कमला नियमीतपणें घरसंसारांतील कामकाज पाहूं लागली व प्रियबाबू नियमीतपणें आपल्या बिछान्यावर पडून राहूं लागले!

अशा रीतीनं संसार सुरळीत चालला होता. परंतु कांहीं दिवसांनंतर प्रियबाबूंची प्रकृति उत्तरोत्तर अधिकच खालावत चालली. एके दिवशीं कमलेस हांक मारून ते म्हणाले, "मी मृत्युपत्र करून ठेवलं आहे." नंतर आपल्या उशीखालीं हात

घालून व एक कागद बाहेर काढून ते वाचून दाखवूं लागले, " माझ्या स्थावर जंगम सर्व मिळकतीचा अर्धा भाग माझे जांवई काशीनाथ यांस व उरलेला अर्धा भाग माझी कन्या कमलादेवी इजला देऊन जात आहें." मृत्युपत्रांतील महत्त्वाचा भाग वाचून दाखवून ते म्हणाले, " कां ? ठीक झालं नाहीं वाटतं ? "

कमलेनं कांहींच उत्तर दिलं नाहीं.

प्रियबाबूंना आश्चर्य वाटलें. ते म्हणाले, " कसं ? तुझ्या मनासारखं झालं ना ? "

कमलेस खूष करण्यासाठींच त्यांनीं असं हें मृत्युपत्र केलं होतं. त्यांना अशी खात्री वाटत होती कीं, आपला पति मालमत्तेचा खराखुरा मालक झाल्याचं पाहून तिला आनंद होईल. परंतु कमलेच्या मनांत जी विचारमालिका सुरू झाली होती, ती उघड बोलून दाखवायला तिला लाज वाटत होती. प्रियबाबूनीं पुन्हां विचारलं, " कांहीं सांगायचंय का तुला ? "

मानेनं होकार देऊन कमला म्हणाली, " होय ! "

" काय सांगायचंय ? "

क्षणभर अळंटळं करून कमला म्हणाली, " सारी मिळकत माझ्याच नांवावर करून टाका ! "

" काय बोलतेस हें पोरी ? "

कमल खालीं मान घालून बसली होती.

प्रियबाबू जाणते माणूस होते. या जगांतील नाना प्रकार त्यांनीं पाहिले होते व ऐकले होते. काय केलं असतां काय परिणाम होतो, याची त्यांना बरोबर कल्पना होती. कमलेच्या मनांतील हेतू व त्याचे परिणाम ताबडतोब त्यांच्या डोक्यांत शिरल्याशिवाय राहिले नाहींत. अधिक खोलांत शिरून एकेका गोष्टीची संगति लावून ते पाहूं लागले, तसतशी आस्ते आस्ते दुःखाची कृष्ण छाया त्यांच्या साऱ्या शरीरावर पसरूं लागली. सारा भार उशीवर टाकून ते टेकून बसले होते; आतां त्याच उशीवर डोकें टेकून ते डोळे झांकून पडून राहिले.

कांहीं वेळ उगीच राहून नंतर ते म्हणाले, “ तूं माझी एकुलती एक मुलगी. तुझ्या जीवाला लागेल असं कांहीं मला करायचं नाहीं. सारी मिळकत तुलाच देऊन टाकतों. पण एकंदरींत हें कांहीं बरं होत नाहीं. माझा आशिर्वाद आहे— तूं सुखी हो—पण तसं होईल असं कांहीं मला वाटत नाहीं. माझ्या या उभ्या आयुष्यांत मी पुष्कळसं पाहून गेलों आहें— स्वतः मी तीन लग्नं केलीं—पण तुला सांगतों, या असल्या वृत्तीनं जगांत कुठल्याच स्त्रीला कधींच सुख लाभणार नाहीं.” कांहीं वेळ थांबून पुनः तें म्हणाले, “ दिसायला बरं वाटेल, तूंही खुष होशील, असा विचार करून तुम्हां दोघांनाही सारी

मिळकत सारख्या प्रमाणांत वांटणी करून देऊन जाणार होतों. मला माहित आहे, तूं आणि तो कांहीं दोन नव्हेत. बरं, मला असं सांग पोरी, मिळकत त्याला मिळूं नये असं तुला कां वाटतं ?"

रडकुंडीला येऊन कमला म्हणाली, "मिळकत हातीं आली तर ते माझ्याकडे ढुंकूनसुद्धां पहाणार नाहींत."

"आणि मिळकत न मिळाली तर ?"

"माझ्या मुठींत राहातील."

प्रियबाबू म्हणाले, "काशीनाथला मी ओखळतों, तूं त्याला अजून ओळखलं नाहींस. अगदीं आपल्या बापासारखा आहे तो. मुळांतच जर तुझं त्याचं पटत नसेल तर मिळकत मिळाली तरीही पटायचं नाहीं नि न मिळाली तरीही पटायचं नाहीं. कमला, पोरी, अशानं का नवऱ्याला मुठींत ठेवतां येतं ? जंगलच्या वाघाला जबरदस्तीनं पकडून ठेवतां येईल पण लहानशी कळी कांहीं जबरदस्तीनं फुलून उमलणार नाहीं."

आणखी कांहीं वेळ ते स्तब्ध राहिले आणि म्हणाले, "देव करो आणि तुझी इच्छा पुरी होवो. पण हा मार्ग कांहीं योग्य नाहीं. त्यानं जर तुला जवळ केलं नाहीं तर एवढं करून काय मिळवल्यासारखं होईल ? असं पहा, जें कांहीं राहील त्यांतल्या अर्ध्या मिळकतींत तुझं नाहीं का भागायचं ?

आणखी एक गोष्ट—देह, मन, आत्मा, इथलं, परलोकचं जें जें कांहीं असेल तेवढं पतीला अर्पण केलं पाहिजे. जिथं सर्वस्वच द्यायचं तिथं अर्धी मिळकत काय देतां येत नाहीं? कमला, असं करूं नकोस पोरी. कधीं काळीं जर हें त्याला कळेल तर मोठा घाव बसेल त्याच्या मनावर."

कमलेनं कांहींच उत्तर दिलं नाहीं आणि प्रियबाबूंनींही तिला आणखी कांहीं विचारलं नाहीं. चांगला अर्धा तास दोघंही उगीच बसून राहिलीं होतीं.

काळोख पडूं लागला होता. दासी येऊन दिवा लावून गेली. डोळे पुसून उठून कमला आपल्या रोजच्या कामाला लागली.

दुसऱ्या दिवशीं प्रियबाबूंनीं आपल्या वकिलाला बोलावून घेतलं. ते म्हणाले, " मी मृत्यूपत्र बदलणार आहें."

वकिलानं विचारलं, " काय बदलणार?"

" जांवयाचं नांव काढून टाकून सारी मिळकत माझ्या मुलीच्या नांवें करून टाका."

" असं कां?"

" ती चर्चाच नको. मी सांगितली तशी दुरुस्ती करा."



प्रियबाबूंच्या मृत्यूनंतर श्राद्धकर्म उरकल्यावर ज्यावेळीं त्यांचं मृत्युपत्र वाचलं गेलं त्यावेळीं काशीनाथाला वाईट वाटलं नाहीं कीं आश्चर्य वाटलं नाहीं. रोज जगांत जसं घडून येतं—जसं कांहीं घडणं योग्य आहे—तसंच हें घडून आलं आहे, दुःख कसलं आणि आश्चर्य तरी कसलं ?

तरीही दिवाणजींनीं काशीनाथला एकांतांत गांठून म्हटलं, "जांवईबुवा, धन्यांनीं हें असं मृत्युपत्र कां केलं त्याची मला कल्पनाच होत नाहीं. पूर्वीं त्यांनीं एकदां वुईल केलं होतं, त्यांत आपल्याला आणि कमलेला त्यांनीं अर्धी अर्धी वांटणी करून दिली होती. कुणाच्या सांगणीनं, कुणाच्या चिथावणीनं हें मृत्युपत्र बदललं गेलं याची अटकळ मला मुळींच करतां येत नाहीं."

थोडंसं हंसून काशीनाथ म्हणाला, "अटकळ करायची काय जरूर आहे ? ज्याची मिळकत त्याला मिळाली आहे. त्यांत तुम्हांला किंवा मला कशाला कांहीं वाटायचं ?"

ओशाळून दिवाणजी म्हणाले, "तरीही—तरीही—"

" त्यांत कसलं तरीही ? तसं पाहिलं तर या मिळकतीवर माझी सत्ता कसली ? मला अर्धी मिळकत दिली असती तरच मला आश्चर्य वाटलं असतं खरं. मला अर्धी देणं म्हणजेच तिला सगळी मिळकत देणं. त्यांत कसला भेदाभेद आहे का ? "

दिवाणजी यावेळीं अधिकच ओशाळून गेले. ओशाळल्या मुद्रेनें ते म्हणाले, " नाहीं, नाहीं, तसा भेदाभेद कांहीं नाहीं. पण धन्यांची इच्छा काय होती तेवढंच मी सांगितलं. पुष्कळ गोष्टी ते मला सांगत असत, एवढ्यासाठींच मी हें बोलून गेलों. "

" त्यांनीं आपलं कर्तव्य बजावलं. विचार करून पहा, स्त्रीला पतीशिवाय दुसरी गति नाहीं. पण पतीला मात्र स्त्रीशिवाय दुसरी गति आहे. मी एक दरिद्री माणूस आहें. एकाएकीं एवढी मोठी मिळकत हातीं आली तर त्याचे दुष्परिणाम होणं शक्य आहे या अंदाजानं कदाचित् त्यांनीं पूर्वीचं मृत्युपत्र बदलून टाकलं असेल. "

काशीनाथ म्हणजे एक पढतमूर्ख पंडीत आहे असा म्हाताऱ्या दिवाणजीचा समज होता; पण त्याच्या तोंडचा हा अचुक युक्तिवाद ऐकून त्याला धन्यवाद दिल्यावांचून त्याच्यानं रहावेना.

दिवसेंदिवस काशीनाथच्या समंजसपणाचा अनुभव त्या

म्हाताऱ्या दिवाणजीला जसा येत होता तसाच उत्तरोत्तर वाढणारा कमलेचा अजाणपणाही त्याला पटत चालला होता. दिवसांतून शंभर वेळां तो आपल्यालाच प्रश्न करी, ' कोणत्या प्रकारचा माणूस आहे हा ? ' शंभर वेळां त्या प्रश्नाचं उत्तर न देतां आल्यामुळें तो आपल्याशींच ओशाळून म्हणे, ' नाहीं, कांहीं कळत नाहीं. '

हजार प्रकारें हजार बाजूंनीं कमलेनं प्रयत्न करून पाहिले, पण तिला अचूक अटकळ करतां येईना. दोन हातापायावर उभा राहिलेला हा माणूस कुणी घडवला ? त्याचं मन त्याच्या स्वतःच्या देहांतच आहे कीं दुसऱ्या कुठं तरी त्यानं तें गहाण टाकलं आहे ? तिला दिसून येत होतं, सारीं माणसं जसं वागतात तसाच तिचा नवरा वागत होता. तसाच जेवीत होता, तसाच झोंपी जात होता, जमीदारीचा व्यवहार तसाच पहात होता, संसाराची उलाढाल इतर चार लोकांसारखीच करीत होता—सारीं कामं अगदीं मन लावून करीत होता; तरी पण साऱ्या विषयांत अगदीं उदासीन होता. या आपल्या पतीचं मन कुठं गुंतलं आहे, कुठं त्याची अधिक ओढ आहे, याची एवढीसुद्धां अटकळ एवढ्या दिवसांच्या सहवासांतदेखील कमलेला आली नाहीं.

कमला कधीं आजारी झाली, तर रात्रंदिवस उघड्या

डोळ्यांनीं तो तिच्या बिछान्याशेजारीं बसून राही. त्यावेळीं त्याची मुद्रा मोठी केविलवाणी दिसे. त्याच्या हृदयांत सांठवलेला केवढा तरी स्नेह, केवढं तरी प्रेम, जसं कांहीं फुटून बाहेर पडतं आहे असं वाटे. तीच ती बरी झाली आणि मग त्याच्या समोरून गेली तर काशीनाथ तिच्याकडे ढुंकूनही पहात नसे. डोळ्याला डोळासुद्धां देत नसे. आपल्याच रंगांत रंगून आपल्या कामाला निघून जात असे.

केव्हां केव्हां कमला रुसवा दाखवून एक दोन दिवस त्याच्याशीं भाषण बंद करी. पण त्याच्यावर कांहींच परिणाम होत नसे. तो नुसता तिच्याजवळ येई आणि निघून जाई. तिला आळवीत नसे कीं विव्हळत नसे—नुसतं बोलतसुद्धां नसे. ती बोललीच तर तो हंसण्यावारी नेई—त्यानं कधींच रागरोष दाखवला नाहीं. ‘ दोन दिवस आपल्याशीं कां बोलली नाहींस, कां रुसली होतीस ? ’ असं एकदां सुद्धां तो विचारीत नसे.

पुष्कळ दिवस कमलेनं आपल्या मनाशीं विचार करून पाहिलं, चांगल्या अटीतटीनं मनाशीं ठरवून आपल्या या उदासवाण्या नवऱ्याला असं म्हणावं असं तिनं ठरवलं कीं, ‘ तूं माझी पर्वा करीत नाहींस तर मलाही तुझ्यापाशीं बेपर्वाई करतां येते. तूं मला टाळत रहावंस आणि मी तुझ्या पायाची पायधूळ होऊन लोळत पडावं एवढं कांहीं माझं प्रेम नाहीं तुझ्यावर ! ’

केव्हां तो दिसला तर तोंड फिरवून मोठ्या गंभीरपणानें कमला निघून जात असे. असं करण्यांत जणूं काय ती म्हणत असे, ' दया दाखवून तुला नवरा म्हणून पत्करलं आहे पण तेवढयासाठीं तुझ्या पायावर जीव सांडून राहीन, जेव्हां जेव्हां तूं समोर दिसशील तेव्हां तेव्हां गोड गोड हंसून गोड गोड बोलेन, असं मात्र समजूं नकोस. मी कामांत गुंतलें असलें तर मी सुद्धां तुझ्याकडे ढुंकून पहाणार नाहीं. '

केव्हां केव्हां कुणा नोकर चाकराला ती रागें भरून बोलूं लागली आणि त्यावेळीं काशीनाथ जर त्या बाबतींत कांहीं बोलला, तर त्याचं भाषण ती मुळींच जमेस धरीत नसे. जें बोलायचं तेंच बोलत राही. ' हे नोकरचाकर दासदासी माझे आहेत, वाडी माझी आहे, घर माझं आहे. मला वाटेल त्याला मी बोलेन, त्यांत तुझी ही अयाचित मध्यस्थी कशाला ? ' असंच बोलून दाखवायचा जणूं कांहीं तिचा इरादा असे.

पण यानं काय मनाचं समाधान होत होतं ? अशानं काय मनांतली कामना पुरी होत होती ? एक रतीभर जरी काशीनाथ वठणीला आला असता तर तिचं समाधान झालं असतं. पण तो स्वतःच्या रंगांत दंग होऊन राहिला होता. काय वाटेल तें झालं तरी त्याची गंभीर मुद्रा यत्किंचितही बदलत नव्हती. तो अगदीं स्पष्ट दाखवून देत सांगत होता, ' मेरुशिखरा-

सारखा मी घट्ट बसून राहिलों आहें. मला एक तसूभरसुद्धां हालवण्याची ताकद तुझ्याठायीं नाहीं. वाटेल तितक्या वारा वावटळी येवोत, झाडापेडाची उलथापालथ होवो, पण मी मात्र आपल्या जाग्यावरून एक तसूभरही हालणार नाहीं.'

ठीक, कमलेच्या हृदयांत काय प्रेमच नव्हतं ? होतं—पण तें प्रेम निस्सीम नव्हतं, निर्विकार नव्हतं. ही एवढी मर्यादा आपण घालून दिली आहे त्या मर्यादेबाहेर त्यानं जातां कामा नये असा दंडक कमला घालीत होती. या मर्यादेबाहेर गेलास तर तें मी सहन करणार नाहीं—कदाचित असं झालं असतांही माझं प्रेम राहील; पण तुझी मर्यादा मात्र मी राखणार नाहीं, असंच जणुं काय ती त्याला जाणवून देण्याचा प्रयत्न करी.

आपल्या म्हाताऱ्या दाईला एके दिवशीं ती गहिंवरून म्हणाली, "माझे बाबा या एका जनावराच्या हातीं मला देऊन गेले!"

"असं कां म्हणतेस ताई ?"

"पुन्हां कां विचारतेस उगीच ? माझे हातपाय बांधून यापेक्षां मला पाण्यांत कां फेकून दिलं नाहीं तुम्हीं ?"

"असं कुणी कधीं म्हटलं आहे का ताई ?"

"कां म्हणायचं नाहीं ? तुम्हीं वाटेल तें करावं आणि मी नुसतं बोलूं सुद्धां नये ?"

" नाहीं, तसं नाहीं. तो तसा मोठा भला माणूस आहे. पण डोक्याचा स्क्रू जरा ढिला आहे. त्याचा बाप जरा वेडसरच होता. त्यामुळं जांवईबुवा—"

" गप्प बैस, वेडाबिडा कांहीं म्हणूं नकोस. बाप वेडा असला तर मुलगा कांहीं वेडा होत नाहीं. मुळींच वेडा नाहीं. मुद्दाम जाणून बुजून मला छळीत असतो तो ! "

आपला नवरा वेडा आहे असं कबूल करणं कमलेला मोठं कठीण गेलं.

*　　*　　*

आणखी तीन दिवस गेले—काशीनाथचा पत्ता नव्हता. कमलेनं जाणून बुजून दोन दिवस त्याचा तपास केला नव्हता. पण तिसऱ्या दिवशीं ती अस्वस्थ झाली आणि दिवाणजीला बोलावून म्हणाली, " दोन दिवस झाले. बाबूजी घरीं आले नाहींत. तुम्हीं जर त्यांची कांहींच चौकशी करीत नाहीं तर इथं असतां कशाला ? "

दिवाणजी आपल्याशींच म्हणाले, " मी काय करूं ? कोण कुठं निघून जात असेल त्याच्यावर मी पाळत कशी ठेवूं ? "

खजांचीकडे त्यांनीं चौकशी केली, त्यावेळीं त्यांना कळून आलं कीं तीन हजार रुपये घेऊन जांवईबाबू कुठं तरी निघून

गेले. आपण कुठं जातों, केव्हां परत येणार, याबद्दल कुणाकडेसच कांहीं बोलले नाहींत.

कमला कपाळावर हात धरून कांहीं वेळ बसून राहिली. त्यानंतर बापाच्या वकिलाला बोलावून ती म्हणाली, “ इस्टेटीची व्यवस्था पहाण्याजोगा कुणी तरी लायक माणूस एक आठवड्याच्या आंत बघून द्या. पडेल तो पगार मी देईन. ”



कलकत्त्यांतल्या एका सामान्य चिंचोळ्या गल्लींतील एका छोट्या एकमजली घरांत काशीनाथनं प्रवेश केला त्यावेळीं तो सारा दिवस पाण्यानं चिंब भिजून गुढगाभर चिखलांतून चालत आलेला होता. त्याच्या हातीं औषधाच्या दोन बाटल्या, एक बिस्कुटाचं टिन् आणि उपरण्याच्या पदराला बांधलेल्या बेदाणा वगैरे जिनसांच्या पुड्या होत्या.

या घरांतल्या एका खोलींत जमिनीवर अंथरलेल्या बिछान्यावर एक रोगी निजला होता. आणि त्याच्या शेजारीं बसून एक बाई त्याच्या डोक्यावरून हात फिरवीत होती.

काशीनाथ खोलींत आला त्यावेळीं ती बाई म्हणाली, " असा पाण्यांत भिजून कां आलास काशीदादा ? कुठं आडोशाला कां उभा राहिला नाहींस ? "

" असं कसं होईल ताई ? भिजलं तरी भीति नाहीं, पण पावसांत उभं राहणं धोक्याचं असतं. "

" खरंच तें—" बिंदूला वाटलं, काशीनाथनं म्हटलं तें कांहीं चुकीचं नव्हे, म्हणून ती उगीच राहिली.

गेलीं कित्येक वर्षं बिंदू जे क्लेश भोगीत आली होती त्याची जाणीव तिची तिलाच होती. ती माहेरीं आल्याचा उल्लेख पूर्वीं आला आहे, त्यानंतर तिचा पत्ता नव्हता.

आतां थोडा तिचा इतिहास सांगतों.

जमीदाराच्या मुलीला भेटायला जाण्यासाठीं सारी तयारी करून ज्या दिवशीं तिला जातां आलं नाहीं त्याच्याच दुसऱ्या दिवशीं तिचा सासरा गोपाळबाबू अत्यवस्थ आजारी झाल्याची बातमी आल्यामुळें तिला तेव्हांच सासरीं यावं लागलं होतं.

ती सासरीं आली त्यावेळीं तिला दिसून आलं कीं, सासऱ्याची कठिण अवस्था झालेली होती. यथाशक्ति सर्वांनीं सर्व उपाय केले पण गोपाळबाबूंना वाचवणं कांहीं शक्य झालं नाहीं.

आपली स्थिति कठिण झाली आहे असं दिसून आलं त्या वेळीं गोपाळबाबू म्हणाले, " धाकट्या सूनबाईला एकदां घेऊन या. एकदां शेवटचीं भेट होऊं दे." धाकटी सूनबाई म्हणजेच आमची बिंदूवासिनी.

मरणाच्या पूर्वीं एकदोन दिवस बिंदूला बोलावून घेऊन गोपाळबाबू म्हणाले, " सूनबाई, ही चावी घे. या पेटींत जें

कांहीं आहे तें मी तुला दिलंय !" हात पुढं करून बिंदूनं पेटीची चावी घेतली.

म्हाताऱ्यानं मरतांना आपली सारी पुंजी बिंदूला देऊन टाकली असा बाकीच्या सुनांनीं समज करून घेतला.

आणखी एक गोष्ट—आजारी असतांना गोपाळबाबूंनीं एक दिवस आपल्या चारी मुलांना जवळ बसवून घेऊन म्हटलं, "असं पहा मुलांनो, तुम्हां भावाभावांचं आपसांत पटत नाहीं. तुमची आई आतां हयात नाहीं. माझ्या मृत्यूनंतर तुम्हीं आतां एकत्र राहूं नका. उगीच भांडणं व्हावीं, मग विभक्त व्हावं, त्यापेक्षां सरळ आहे तोंपर्यंत आधींच विभक्त होणं बरं. तुमच्यासाठीं मी जें कांहीं मागं ठेऊन जातों आहें त्यावर तुम्हीं जर कांहीं अल्पस्वल्प उपार्जन केलं तर तुमचे संसार सुखाचे होतील."

बापाच्या मृत्यूनंतर सारे भाऊ विभक्त झाले. बिंदूनं एके दिवशीं पेटी उघडून पाहिलं तेव्हां त्यांत एक रामायणाची आणि एक महाभारताची अशा दोन पोथ्यांखेरीज दुसरं कांहींच नव्हतं असं तिला दिसून आलं. आशेची अशी निराशा झाली तरीही स्वर्गवासी सासऱ्याचं हें दान बिंदूनं मस्तकीं धारण केलं. बिंदू गहिंवरून म्हणाली, "त्यांचं हें स्नेहाचं दान ! हींच माझीं हिरे–माणकं !"

बिंदूच्या संसारांत यानंतरचे कांहीं दिवस सुखासमाधानाचे

गेले. त्यानंतर संकटांना सुरुवात झाली. बिंदूचा नवरा योगेश-बाबू आजारी पडला. जीव टाकून बिंदूनं त्याची सेवासुश्रुषा केली. औषधपाण्यासाठीं जमीन गहाण टाकावी लागली, पण कांहीं केल्या कांहीं झालं नाहीं. गांवच्या शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं सांगितलं कीं, कलकत्त्याला नेलं तर चिकित्सा करणं सोईचं होईल. तेव्हां अंगावरचे सारे दागिने विकून नवऱ्याला घेऊन ती कलकत्त्याला आली.

निरनिराळ्या प्रकारचे उपचार करण्यासाठीं शिल्लक असलेला जमिनजुमलाही हळुहळू गहाण पडला. पण रोग हटण्याचं चिन्ह दिसेना. पैशाच्या अभावीं चांगल्या रीतीनं औषधोपचार करणं अशक्य होऊन बसलं.

नवऱ्याच्या मोठ्या भावाला पत्र लिहून बिंदूनं सारी हकीकत कळवली, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्यानं एक कोरडं उत्तरसुद्धां पाठवलं नाहीं. नंतर दुसऱ्या दोघां भावांना पत्रं लिहिलीं, पण त्यांनींही वडील भावाचं अनुकरण करून मौन स्वीकारलं. बिंदूला कळून चुकलं, कीं आतां एक उपासमार तरी होणार, किंवा विष खाऊन जीव द्यावा लागणार.

पत्नीच्या मुद्रेवरून योगेशबाबूला खऱ्या परिस्थितीचा अंदाज आला. एके दिवशीं तिला जवळ बसवून घेऊन प्रेमानं तिचा हात धरून तो म्हणाला, “ बिंदू, आतां मला घरीं

घेऊन चल. मरायचं असलं तर मला माझ्या वास्तूखालीं मरूं दे. इथं मेलों तर उचलायला माणसंसुद्धां मिळायचीं नाहींत !"

आतां बिंदूला कळून चुकलं, कीं मरण कांहीं टळत नाहीं. दुसरा कांहीं उपायच राहिला नव्हता. नवऱ्याला घरीं घेऊन जावं म्हटलं तर तें सुद्धां अशक्य झालं होतं.

पण अशा परिस्थितींत का त्याची शेवटची घटका येऊं द्यायची ? आणि जर मरणच चुकत नाहीं तर लाज तरी कसली धरायची ?

तिनं आपल्या मनाशीं पुष्कळ विचार करून पाहिला आणि शेवटीं सारी लाजशरम गिळून टाकून काशीनाथला सारी हकीकत पत्रद्वारें कळविली. पुढं काय झालं तें आपल्याला कळून चुकलं आहे.

येतांना काशीनाथनं बरीच मोठी रक्कम बरोबर आणली होती. बराच पैसा खर्च करून त्यानं चांगल्या चांगल्या डॉक्टरांचा सल्ला घेतला, तेव्हां त्यांनीं सांगितलं कीं हवापालट केल्याशिवाय रोग बरा होणार नाहीं.

सर्वांना घेऊन काशीनाथ वैद्यनाथ गांवीं आला. एकदोन महिने तिथं मुक्काम केल्यावर वाटूं लागलं कीं, योगेशबाबू कांहीं आतां मरत नाहीं.

तरीही हवेचं ठिकाण इतक्या लवकर सोडणं इष्ट नव्हतं, म्हणून त्यांना तिथंच ठेऊन काशीनाथ आपल्या गांवीं निघून आला.

सकाळींच उठून कमला पहाते, तों काशीनाथ आलेला. तिनं विचारलं, " केव्हां आलांत ? "

" रात्रीं आलों. "

कमला आपल्या कामाला लागली.

बाहेर येऊन काशीनाथ कचेरीच्या खोलींत प्रवेश करता झाला. फारा दिवसांनीं तो आलेला पाहून नोकर लोक उठून उभे राहिले. पण साहेबी पोषाख केलेला एक तरुण मात्र खुर्चीवरच बसून राहिला. कुणीतरी एक माणूस आलेला पाहून आपल्या नोकरांनीं त्याला खडीताजीम दिली हें त्या तरुण बाबूजींच्या खिजगणतींतही आलं नाहीं.

स्वतः एक खुर्ची ओढून घेऊन काशीनाथ तिथंच बसला.

हे जे नवीन गृहस्थ आले होते ते मॅनेजर या नात्यानं. त्यांचं नांव श्रीयुत विजयकिशोर दास. कलकत्त्याला बी. ए. होऊन ते आले होते. फार कामसू आणि दक्ष माणूस, म्हणूनच विनोदबाबू-वकिलांनीं मॅनेजरीच्या कामीं त्यांची नेमणूक केली होती.

कांहीं वेळ गेल्यानंतर काशीनाथकडे वळून मॅनेजरसाहेब म्हणाले, " आपलं कांहीं काम आहे का महाशय ? "

" नाहीं. काम नाहीं. इथलं काम कसं चालतंय तेंच पहायला आलों आहें. "

दिवाणजी यावेळीं समोर उभे राहून म्हणाले, " हे आपले जांवईबाबू. "

बैठकीवरून उठल्यासारखं करून विजयबाबूंनीं जांवईबाबूंचं गोड शब्दांनीं स्वागत केलं.

याच वेळीं आंतून एक नोकर आला आणि विजयबाबूला म्हणाला, " आंत बाईसाहेब आपल्याला बोलावताहेत. "

विजयबाबू निघून गेल्यावर दिवाणजीला बोलावून काशीनाथ म्हणाला, " कोण हा ? "

" नवे मॅनेजर. "

" कुणी नेमलं याला ? "

" बाईसाहेबांनीं नेमलं. "

" कां ? "

" कामकाज व्यवस्थितपणें होत नव्हतं म्हणून वाटतं ! "

" आतां कुठं गेला हा ? "

" आंत—अंतर्महालांत. "

जास्त कांहीं न विचारतां काशीनाथ उठून आंत आला. आंत येतांच त्याला दिसून आलं कीं, एका खोलींत विजयबाबू पडद्यासमोर उभे आहेत आणि पडद्याआडून कुणी तरी नाजूक आवाजांत बोलत आहे.

कसल्या गोष्टी चालल्या होत्या याचा काशीनाथला अंदाज होता, पण कांहींच न बोलतां, इतकंच नव्हे, तर त्या बाजूला ढुंकूनसुद्धां न पहातां काशीनाथ आपल्याच रंगांत तिथून निघून गेला.

दोन प्रहरीं पुनः एकदां त्याची आणि कमलेची भेट झाली. त्यावेळीं कमलेनं गंभीरपणें प्रश्न केला, " प्रकृति बरी आहे ना ? "

तितक्याच गंभीरपणें मान हालवून काशीनाथ म्हणाला, " बरी आहे."

आणखी एकसुद्धां शब्द न बोलतां कमला निघून गेली. उगीच उभं राहून सटरफटर गप्पा गोष्टी करायला तिला आतां वेळ नव्हता. शेंकडों कामं पडून राहिलीं होतीं. विशेषतः स्वतःच्या इस्टेटीची व्यवस्था स्वतः पहाण्याचं तिनं पत्करल्या-पासून तिला श्वास टाकायला सुद्धां फुरसत नव्हती.

एके दिवशीं सकाळीं काशीनाथनं मॅनेजरला बोलावणं पाठवलं. नोकराकरवीं मॅनेजरचा जबाब आला, " यावेळीं वेळ नाहीं. मोकळा झाल्यावर येईन."

काशीनाथ स्वतः कचेरीच्या जागीं येऊन विजयबाबूला एका बाजूला बोलावून घेऊन म्हणाला, " तुम्हांला वेळ नाहीं म्हणून मीच स्वतः आलों आहें. आज मला पांचशें रुपये

पाहिजे आहेत. वेळ होतांच रक्कम वर माझ्याकडे पाठवून द्या."

" कोणत्या कामासाठीं ? "

" तें तुम्हांला सांगायची कांहीं जरुरी नाहीं."

" नाहीं खरं, पण मालकांच्या परवानगीशिवाय मी पैसे कसे देऊं ? "

काशीनाथला कळून चुकलं, कीं एकंदरींत परिस्थिति भलतीच झाली आहे. तो म्हणाला, " मी सांगितलं तेवढं बस्स झालं. या शिवाय आणखी कुणाची परवानगी हवी ? "

करड्या शब्दांत विजयबाबू म्हणाले, " हो. हवी ! वाटेल त्याला पैसा द्यायचा मला हुकूम नाहीं."

कमलेला गांठून काशीनाथ म्हणाला, " तुझ्या या नव्या माणसाला घालवून दे."

" कुणाला ? "

" हा तुझा जो नवा मॅनेजर आला आहे त्याला. "

" कां ? त्यांनीं काय केलं ? "

" माझ्याशीं नीटसा वागला नाहीं. "

" काय केलं ? "

" मी बोलवायला पाठवलं तर आला नाहीं. ' मला वेळ नाहीं—वेळ होईल तेव्हां येईन ' असा निरोप नोकराकरवीं पाठवला. "

कमला हंसून म्हणाली, " खरोखरच वेळ नसेल त्यांन कामांत असलेला माणूस काम टाकून कसा येईल ? "

पत्नीच्या चेहऱ्याकडे पहात काशीनाथ म्हणाला, " ठीव वेळ नव्हता म्हणून आला नाहीं; पण मी स्वत: गेलों, त्याच्य कडे पैसे मागितले, तेव्हां मालकाच्या परवानगीशिवाय पै देत नाहीं म्हणाला. "

कमला अगदीं नाजुक हंसून म्हणाली, " किती पै मागितले ? "

" पांचशें. "

" दिले नाहींत ? "

" नाहीं. मला पैसे द्यायचे नाहींत असं तूं सांगित आहेस का ? "

" हो. तुम्हीं वाटेल तसे पैसे उधळावे अशी मा इच्छा नाहीं. "

काशीनाथाला—दगडी हृदयाच्या काशीनाथालासुद्धां मर्म वर घाव बसला असं वाटलं. यापूर्वी तिनं त्याच्याशीं असं वर्त केलं नव्हतं किंवा असली भाषा त्यानं केव्हांच तिच्या तों ऐकली नव्हती. फार संतापून तो म्हणाला, " मला देणं म्हण उधळणं का ? "

" कसं का असेना—खर्च करणं म्हणजे उधळणं. "

" कामासाठीं पैसा लावणं म्हणजे खर्च करणं नव्हे. "

" कसलं काम ? "

" एकाला द्यायचे आहेत. "

" द्यायचे आहेत खरे—पण यायचे कुठून ? स्वतःच्य गांठीला असले तर द्यावे—मी कांहीं नको म्हणणा नाहीं. "

काशीनाथ उगीच राहिला. तिचे शब्द तापलेल्या सळ्य सारखे त्याच्या कानांत सणसणत शिरले.

तो बाहेर निघून आला. आपलं घड्याळ आंगठी वगै जिन्नस विकून टाकून त्यानं पांचशें रुपये उभे केले आणि वैद्यनाथाला पाठवून दिले व खालीं दोनच ओळी मजकूर त्या लिहिला, " आतां आणखी मागूं नकोस ताई. माझ्यापाशीं आत कांहीं नाहीं. "

त्या दिवसानंतर काशीनाथनं अंतर्गृहांत मुळींच प्रवे केला नाहीं. कमलेनंही त्याची मुळींच चौकशी केली नाहीं.

असेच कांहीं दिवस निघून गेले. एके दिवशीं कुणी ए ब्राह्मण भेटायला आला आहे, असं नोकरानं येऊन त्याल सांगितलं. त्याच्या पाठोपाठ एक म्हातारा ब्राह्मण हातां जानवं धरून समोर येऊन उभा राहिल्याचं पाहून काशीना आश्चर्यचकित झाला.

तो ब्राह्मण म्हणाला, " आपण मोठे माणूस. ब्राह्मणाचा असा सत्यानाश करूं नका. "

काशीनाथ घाबरून म्हणाला, " काय झालंय ? "

ब्राह्मण म्हणाला, " आपल्यापाशीं यथेष्ट आहे, पण या एवढ्याशा जमिनीच्या तुकड्याखेरीज मला दुसरा आधार नाहीं. माझं हें एवढं सर्वस्व हिरावून घेऊं नका. " बोलतां बोलतां ब्राह्मणाला एकदम रडूं कोसळलं.

काशीनाथ अस्वस्थ झाला. हात धरून जवळ बसवून घेऊन त्यानं त्या ब्राह्मणाला विचारलं, " सारी हकीकत मला मोकळ्या मनानं सांगा. "

रडत रडत ब्राह्मण म्हणाला, " आपण धर्मशील अहांत— शपथ घेऊन सांगा पाहूं, क्षेत्रपालची इनामी जमीन माझी नव्हे का ? "

" कोण म्हणतो तुमची नव्हे म्हणून ? "

" तर मग आपले नवे मॅनेजर विजयबाबू यांनीं माझ्या नांवें दावा का मांडला आहे ? "

" दावा मांडला आहे ? मला तर कळलं नाहीं. "

समन्स दाखवून ब्राह्मण म्हणाला, " आतां खटला सुरू होणार आहे. या दाव्यांत मी तुमची साक्ष देणार आहें. मी दरिद्री माणूस, आपल्यासारख्यांबरोबर वाद माजवणं मला

शोभत नाहीं. पण सर्वनाश व्हायच्या पूर्वी स्वतःची जमीन मी अशी बिनबोभाट हातची जाऊं देणार नाहीं. "

रागारागानं ब्राह्मण निघून जाऊं लागला असं पाहून काशीनाथनं पुन्हां त्याचा हात धरून त्याला बसवून घेतलं आणि म्हटलं, " माझ्याकडून होईल तेवढं मी करीन, याउप्पर तुम्हांला जें वाटेल तें तुम्हीं करा. "

ब्राह्मणाला निरोप दिल्यावर काशीनाथानं विजयबाबूला बोलावून घेतलं आणि सांगितलं, " ती जमीन आमची नव्हे. उगीच गरिब ब्राह्मणाला त्रास कशाला देतां ? "

" मालकांचा हुकूम आहे. "

काशीनाथ संतापून म्हणाला, " दुसऱ्याच्या वस्तू चोरायला शिकवलं आहे का तुझ्या मालकानं तुला ? "

" ती जमीन आमचीच आहे. "

" नाहीं—आमची नव्हे. "

कांहीं वेळ उगीच राहून विजयबाबू म्हणाला, " मी हुकमाचा ताबेदार. जसा हुकूम झाला आहे तसं करतों आहें आणि तसंच करीत राहीन. "

या बाबतींत कमलेकडे बोलणं काशीनाथच्या जिवावर आलं होतं, तरीही तो म्हणाला, " ती जमीन तुझी नव्हे. ब्राह्मणाच्या ब्रह्मस्वाचा असा अपहार करूं नकोस. "

" कुणी म्हटलं अपहार करतेंय म्हणून ? "

" कुणी का म्हणेना—ती जमीन तुझी नव्हे. खोटा दावा मांडूं नकोस म्हणून विजयबाबूला सांगून टाक. "

चिडीला येऊन कमला म्हणाली, " विजयबाबू आपलं काम जाणतात. त्यांच्या कामांत तुम्हीं हात घालायची जरुरी नाहीं."

कांहीं दिवसांनीं दावा चालू झाला. साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत उभं राहून काशीनाथ म्हणाला, " माझ्या स्वर्गस्थ सासऱ्याच्या मिळकतीची व्यवस्था त्यांच्या हयातींत मीच पहात होतों आणि त्यानंतरही बरेच दिवसपर्यंत व्यवस्था माझ्याच हातीं होती. मला माहित आहे, ही जमीन कमलादेवीच्या मालकीची नाहीं. "

दावा बुडाला. एवढंसं तोंड करून विजयबाबू घरीं परत आले.

प्रतिवादीनं दोन्ही हात उचलून काशीनाथाला आशिर्वाद देऊन आपल्या घरची वाट धरली.

# ९

विजयबाबू पडद्यासमोर उभा राहिला होता. आणि दाव्याची हकिकत स्पष्ट करून सांगतांना शेवटीं स्वतःची मल्लीनाथी करून आगींत तेल ओतीत होता. तो म्हणाला, " केवळ जांवईबाबूमुळं आपण हा दावा हरलों. "

पडद्याच्या आड असलेली आधींच संतापलेली कमला दसपट फुलून उठत होती. बराच वेळ गेल्यावर ती पडद्याआडून म्हणाली, " आपण आंतच या. पुष्कळ बोलायचं आहे. "

विजयबाबूनें आंत प्रवेश केला. दोघंही बराच वेळपर्यंत हळुहळू बोलत होतीं. त्यानंतर विजयबाबू बाहेर निघून गेला.

बऱ्याच दिवसानंतर आज काशीनाथ जेवायला बसला असतां कमला जवळ येऊन बसली. यावेळीं तो पूर्वींचा चंडिकेचा अवतार नव्हता, उलट ती पूर्णपणें शांत आणि गंभीरपणें बसली होती. थोडावेळ थांबून कमला म्हणाली, " घरभेद्या बिभीषणाच्या पायीं सोन्याची लंकापुरी जळून खाक झाली— माहित आहे ना ? "

घांस घेत घेत काशीनाथ म्हणाला, “ माहित आहे. ”

कमला म्हणाली, “ माहित असायचंच. तो बिभीषण देखील दुसऱ्याच्याच अन्नावर वाढला होता ना ? ”

काशीनाथ एक शब्दसुद्धां बोलला नाहीं.

कांहींवेळ थांबून कमला पुन: म्हणाली, “ जन्मभर दुसऱ्याच्या अन्नावर वाढलेला माणूस—दुसऱ्या घरचं अन्न मिळालं नाहीं तर ज्याला उपास पडेल, त्याला सत्याची चाड दाखवायची एवढी हौस कशाला ? आणि एवढा दिमाख तरी कशाला ? ”

एक शब्दसुद्धां न बोलतां काशीनाथ एकामागून एक घास तोंडांत कोंबीत होता.

“ कसाई जरी असला तरी ज्याचं अन्न खातो त्याच्या गळ्यावर सुरी फिरवीत नाहीं. त्याच्याही मनांत दयामाया असते.”

“ कमला ! ”

“ बायकांच्या अन्नावर वाढलेल्या माणसाला एवढा दिमाख शोभत नाहीं. दिवसेंदिवस तुमचं हें जें वर्तन सुरू झालं आहे, लोकलाज नसती तर—”

काशीनाथ हंसून म्हणाला, “ घरांतून घालवून दिलं असतं ? होय ना ? ”

“ खरोखरच घालवलं असतं. ”

अर्धं जेवण झालेलं असतांना समोरचं ताट लोटून काशी-

नाथ कमलेकडे सारखी नजर भिडवून म्हणाला, " कमल! यापूर्वी मी कधींच रागावलों नव्हतों. दुरुत्तरानं तुला कधींच बोललों नव्हतों. आतां तूं जें कांहीं बोललीस तसं, मला वाटतं, यापूर्वी कुणीच बोललं नसेल. आजपासून तुझं अन्न मी खाणार नाहीं. झालं! एवढयानं तरी तूं खूष झालीस म्हणजे झालं." काशीनाथ उठून उभा राहिला.

तितक्याच दिमाखानं उठून उभं राहून कमला म्हणाली, " शब्दाचे सच्चे असाल, कांहीं माणुसकी अंगीं असेल, तर बोललेला शब्द खरा करून दाखवाल!"

" अर्थात् दाखवीन, पण ध्यानांत ठेव—तूं जें कांहीं बोललीस, तो तुझाच शब्द तुझा वैरी होऊन बसेल. मी तुला क्षमा केली आहे; पण ईश्वर तुला क्षमा करील का?"

कमला आणखी संतापून उठली आणि म्हणाली, " तुमच्या शापानं माझं कांहींसुद्धां व्हायचं नाहीं."

" तथास्तु. ईश्वरसाक्ष तुला सांगतों, मी तुला शाप दिला नाहीं. उलट आशिर्वादच देतों—धर्मावर श्रद्धा ठेऊन सुखी हो."

काशीनाथ बाहेर निघून आला. व्याकरण, साहित्य, दर्शन स्मृति, वगैरे जे कांहीं ग्रंथ होते ते एकेक घेऊन त्यानं त्यांच्या फाडून चिंध्या केल्या. आपलं जें कांहीं होतं नव्हतं तें सारं नोकरचाकरांना वाटून टाकलं.

रात्रीं कमलेच्या खोलीच्या दारावर ठोठावून त्यानं तिला हांक मारली. कमला जागी होती पण तिनं उत्तर दिलं नाहीं. दार उघडं आहे असं पाहून काशीनाथ खोलींत गेला, त्यावेळीं त्याला दिसून आलं, कीं कमला डोळे झांकून बिछान्यावर पडून होती. तो तिच्या शेजारीं बसला आणि तिच्या मस्तकावर हात ठेवून त्यानं हाक मारली, " कमल ! " तरीही उत्तर मिळालं नाहीं.

" जातांना तुला आंशिर्वाद देऊन जातों आहें ! " असं म्हणून काशीनाथ हळुहळू बाहेर निघून गेला.

काशीनाथ निघून गेला असं पाहून बिछान्यावरून उठून कमला खिडकींत येऊन बसली. कितीतरी वेळ ती तशीच बसून होती. दिशा फांकताहेत असं पाहून ती पुनः येऊन बिछान्यावर झोंपी गेली.

जाग येतांच कमलेला दिसून आलं, कीं दिवस बराच वर आला होता. वाड्यांत एकच गडबड उडाली होती. ती चांगली जागी होऊन उठायच्या पूर्वींच धांवत ओरडत एक दासी तेथें आली आणि म्हणाली, " सत्यानाश झाला बाईसाहेब ! जावई-बाबूंचा खून झाला ! "

एकाद्याच्या अंगावर तापलेलं तेल ओतलं तर तो ज्याप्रमाणें तड-फडून उठेल त्याप्रमाणें उठून कमला धांवत धडपडत खालीं आली. तिनं विचारलं, " काय म्हणतां ? खरोखरच का खून झाला ? "

कुणी तरी सांगितलं, " हो खरोखरच ! "

तशाच अस्ताव्यस्त कपड्यांत कमला बाहेरच्या दालनांत आली. रक्तानं माखलेला काशीनाथचा चैतन्यहीन देह एका कोचावर पडला होता. साऱ्या अंगावर धूळ आणि रक्त साकळलं होतं. नाकातोंडांतून आणि डोळ्यांतून देखिल वाहिलेलं रक्त तिथंच सुकून खपली धरली होती.

एक हाक फोडून कमला एकदम मूर्च्छा येऊन जमिनी-वर पडली.

हां हां म्हणतां गांवभर बातमी पसरली—रात्रीं काळोखांतून एकटेच जात असतां जमीदार जावईबाबूंचा रस्त्यांत कुणीतरी खून केला.

दोन दिवसांनंतर काशीनाथ शुद्धीवर आला. पोलिस-साहेबांनीं प्रश्न केला, " बाबू, कुणी हें असं केलं ? "

आकाशाकडे नजर करून काशीनाथ म्हणाला, " त्यानं —परमेश्वरानं."

म्हातारा दिवाणजी तिथंच उभा होता. त्याच्या डोळ्यांतून सारखीं आसवं गळत होतीं.

साहेबानं पुनः विचारलं, " बाबू, त्या माणसांना आपण ओळखाल का ? "

अस्पष्ट वाणीनं काशीनाथ म्हणाला, " हो."

साहेबांनीं एकदम विचारलं, "कोण ते ?"

कांहीं वेळ उगीच राहून काशीनाथ म्हणाला, "मी कांहींतरीच बोललों. त्या कुणाची मला ओळख पटली नाहीं."

साहेबानं पुनः एक दोन वेळ प्रश्न करून पाहिलं पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. काशीनाथ त्यानंतर कांहींच बोलला नाहीं.

दुसऱ्या दिवशीं दिवाणजीला बोलावून आणून काशीनाथ म्हणाला, "वैद्यनाथ गांवीं माझी बहिण बिंदुवासिनी आहे. तिची भेट झाली पाहिजे. तिला आणायला कुणी तरी माणूस पाठवा."

तीन दिवसांनंतर बिंदुवासिनी आणि योगेशबाबू येऊन पोहोंचले. बिंदू मोठी खंबीर बायको होती—कमलेसारखी नव्हती. तिनं आरडाओरडा केला नाहीं कीं ती मूर्च्छितही पडली नाहीं. नुसतीं डोळ्यांत आलेलीं आसवं पुसून रडक्या आवाजानं ती म्हणाली, "कुणी हें असं केलं ?"

"तें मला कसं कळावं ?"

"कुणावर संशय आहे का तुझा ?"

"हा प्रश्न मला विचारूं नकोस ताई."

स्तब्ध होऊन बिंदू काशीनाथच्या चेहऱ्याकडे पहात राहिली. या प्रसंगांतून काशीनाथ आतां कांहीं बरा होत नाहीं अशी

सर्वांची खात्री होऊन चुकली होती. प्रत्येक क्षणाला मृत्यूचे पाश अधिकाअधिक घट्ट आवळले जात होते. रात्रीं तापाच्या कैफांत तळमळत काशीनाथ मोठयानं ओरडून म्हणाला, " बोल कमला, हें तुझं काम नव्हे ? "

जवळ येऊन भावाच्या तोंडाजवळ कान देऊन बिंदूनं विचारलं, " काय म्हणतोयस दादा ? "

भ्रमांत बिंदूला कमला समजून दोन्हीं हातांनीं तिचा गळा पकडून धरून काशीनाथ काकुळतीला येऊन म्हणाला, " सांग कमला, एकदांच सांग, कीं हें असलं काम तुझ्याकरवीं घडलं नाहीं ! नाहींतर मला मेल्यावरसुद्धां शांति मिळणार नाहीं ! "

# १०

केव्हां शुद्धींत, केव्हां गैरशुद्धींत तर केव्हां तंद्रेंत डोकं भर-कटल्यासारख्या स्थितींत कमलेचे दोन दिवस निघून गेले. डॉक्टरदेखील तिच्याबाबतींत फारच साशंक झाले होते. डॉक्ट-रच्या सांगण्याप्रमाणें सारी मंडळी डोळ्यांत तेल घालून पहात तिला घेरून बसली होती. दोन दिवस अविश्रांत सेवासुश्रुषा, उपाययोजना, केल्यानंतर संध्याकाळीं ती शुद्धीवर आली. तिला उठवून टेकून बसवण्यांत आलं.

शुद्धीवर आल्यावर कमलेनं सावचेतपणें पाहिलं त्यावेळीं तिला असं दिसून आलं, कीं तिला उठवून आपल्या जवळ घेऊन बसलेली स्त्री अगदींच अपरिचित होती. तिनं विचारलं " कोण तुम्ही ? "

ती अपरिचित स्त्री म्हणाली, " मी बिंदू—तुझ्या नव-ऱ्याची बहीण. "

कितीतरी वेळ एक शब्दसुद्धां न बोलतां कमला नुसती तिच्या तोंडाकडे पहात राहिली होती. नंतर हातानं खूण

करून तिनं तिथं जमलेल्या साऱ्या लोकांना बाहेर घालवून देऊन म्हटलं, " कितीवेळ अशी मी बेशुद्ध होतें वन्सं ? "

बिंदू म्हणाली, " परवां सकाळपासून तूं ही अशी पडून होतीस वहिनी, अगदीं एवढी सुद्धां तुला शुद्ध नव्हती. "

" परवां ! " कमला एकदम दचकली आणि पुनः स्तब्ध झाली. खालीं मान घालून कितीतरी वेळ ती तशीच स्तब्धपणें बसली होती. बराच वेळ झाला तरी ती हूं कीं चूं करीत नाहीं असं पाहून बिंदू घाबरली. आपल्या हातानं तिचा उजवा हात ओढून तिनं हांक मारली, " वहिनी !"

कमलेनं चेहरा वर केला नाहीं—नुसता हुंकार दिला. ती म्हणाली, " भिऊं नका वन्सं. आतां माझी शुद्ध जायची नाहीं."

जिवाचा आटापेटा करून आपलं डोकं ताब्यांत ठेवायचा ती जिवापाड प्रयत्न करीत आहे हें बिंदूला कळून चुकलं. तिला धीर आला आणि म्हणूनच ती कांहीं न बोलतां स्वस्थ बसून राहिली.

किती तरी वेळ कमला तशीच बसून राहिली होती. नंतर ती म्हणाली, " दोन दिवस अशा स्थितींत मला घेऊन तुम्हीं बसलां आहांत वन्सं, माझी अशी सुश्रुषा करावी असं कां वाटलं तुम्हांला ? माझ्या हातून कांहीं असं झालं नसतं. "

कमलेच्या उद्गाराचा भावार्थ बिंदूला चांगलासा कळला

नाहीं. ती म्हणाली, " असं कां वाटूं नये वहिनी ? तूं कांहीं मला परकी नाहींस. यापूर्वी ओळख नव्हती खरी, पण जसा माझा दादा तशीच तूं माझी वहिनी ना ? जशी त्याची सुश्रूषा करायची तशीच तुझीही करतें आहे वहिनी ! कसं सांगूं तुला, इथं येऊन पोहचेपर्यंत एकेक क्षण मी कसा घालवला तें त्या भगवंतालाच माहित. त्यानंतर एकदां दादाच्या खोलींत आणि पुनः तुझ्या खोलींत—त्याच्याजवळ जाऊन बसलें कीं इकडे तुझ्यासाठीं जीव तळमळे, आणि तुझ्याकडे येऊन बसलें कीं सारं लक्ष तिकडे त्याच्याकडे लागे, असं चाललं होतं. आज दुपार-पासून त्याला जरा बरं वाटतंय. त्याला झोंप लागली आहे असं पाहिलं तेव्हां हें तुझ्याजवळ येऊन बसतां आलं. या दुखण्यांतून दादा उठेल अशी कुणालासुद्धां आशा नव्हती बरं वहिनी ! "

" जिवंत आहेत ? " कमला एकदम उद्गारली.

मानेनं होकार देऊन बिंदू म्हणाली, " आहे तर काय ! डॉक्टर म्हणाले कीं आतां कांहीं भय नाहीं. आतां तापही उतरला आहे. "

ही बातमी ऐकत असतां उजळून उठलेला कमलेचा चेहरा पुनः तसाच मेल्यागत काळवंडून गेला. डोक्यापासून पायांपर्यंत तिच्या साऱ्या देहाला थरकांप सुटला आणि दुसऱ्याच क्षणाला पुनः मूर्च्छा येऊन ती बिंदूच्या अंगावर कोसळून पडली.

बिंदूनं आरडा ओरडा केला नाहीं. कुणालाही हाका मारल्या नाहींत. तिचं मस्तक आपल्या वक्षस्थलावर घेऊन कांहीं न बोलतां पंखा घेऊन ती वारा घालीत राहिली. या बाईचं प्रसंगावधान केवढं मोठं होतं याचा प्रत्यय तिच्या नवऱ्याच्या दुखण्याच्या वेळीं येऊन गेला होता. मृत्यु नवऱ्याच्या डोक्याशीं येऊन बसला असतांनासुद्धां ती जशी एवढीसुद्धां डगमगली नाहीं तशीच कमलेसाठींही ती उगीच अस्वस्थ झाली नाहीं.

कांहीं वेळानं कमला शुद्धीवर आली. आपण कुठं आहोंत हें तिनं एकदां डोळे उघडून पाहून घेतलं. तशीच तिच्या खांद्यावर मान टाकून तिला घट्ट कवटाळून ती ओक्साबोक्शीं रडूं लागली.

तें रडणं एवढं जीवतोडीचं—एवढं भारावलेल्या हृदयाचं होतं, कीं बिंदूच्या मायमिठींतसुद्धां तें सुकून वाळत जाऊं लागलं. त्या रडण्याचा एवढासुद्धां आवाज खोलीच्या बाहेर कुणाच्याही कानीं गेला नाहीं.

बाहेर रात्रीचा काळोख दाट होत चालला होता. जिकडे तिकडे सामसुम होतं. केवळ त्या अंधुक उजेडाच्या खोलींत या दोन तरुण स्त्रिया एकमेकांना कवटाळून बसल्या होत्या. एकीच्या फुटलेल्या हृदयांतल्या साऱ्या ज्वाला दुसरीच्या गंभीर आणि शांत अशा पांखरीखालीं सहजासहजीं निवून जात होत्या.

कांहीं वेळानं कमला भानावर आली—थंडावली—नवऱ्याच्या प्रकृतीबद्दल तिनं बरीचशी विचारपूस केली—पण स्वतः जाऊन त्याला पाहून यावं असं तिला कां वाटलं नाहीं हें बिंदूला कांहीं केल्या अंदाजतां येईना. एकवेळ तिला असं वाटलं, मोठ्या लोकांची ही अशीच रीत असेल—हेंच त्यांचं सरावाचं लक्षण. सेवासुश्रुषेचा भार नोकरचाकरांवर टाकून आपण नुसती बाहेरून चौकशी करायची अशीच त्यांची पद्धत असेल!

एकदम कमलेनं विचारलं, "बरं! वन्सं, तुमचा दादा शुद्धीवर आला तेव्हां त्यानं माझी चौकशी केली का?"

"एकदां विचारलं होतं.—" असं म्हणून बिंदू एकदम थांबली. कमलेच्या तें ध्यानीं आलं पण पुनः प्रश्न न करतां मोठ्या आतुरतेनं ती बिंदूच्या चेहऱ्याकडे केविलवाणी पहात राहिली.

कांहीं वेळ थांबून बिंदु म्हणाली, "दादा जेव्हां शुद्धीवर आला, तेव्हां तूंच आहेस असं समजून माझा गळा धरून तो ओरडत उठला, 'सांग कमला, एकदांच सांग कीं हें असलं काम तुझ्याकरवीं घडलं नाहीं. नाहींतर मी मेल्यावरसुद्धां मला शांति मिळणार नाहीं!'"

श्वास रोधून कमला म्हणाली, "बरं मग?"

बिंदु म्हणाली, " त्याला काय कळायला हवं होतं तेंच मला कळलं नाहीं वहिनी."

" तें मला माहित आहे वन्सं." असं म्हणून कमला एकदम उठून बसली.

कमलेचा हात धरून तिला खालीं बसवीत बिंदू म्हणाली, " त्या तिकडे जाऊं नकोस वहिनी. "

" कां जाऊं नको ? "

" डॉक्टरनीं बंदी केली आहे. तूं दिसलीस तर त्याचं दुखणं उलटेल. त्यांत धोका आहे. "

" माझा धोका माझ्यापेक्षां डॉक्टरला जास्त कळायचा नाहीं वन्सं. मी तिकडे जाणार. झोंपेतून जागे झाले आणि मला कांहीं विचारायचं असलं तर मला त्याचा वेळींच जबाब द्यायला हवा ! " असं म्हणून कमलेनं बिंदूचा हात घेऊन आपल्या गळ्याभोंवतीं कवटाळून धरला आणि ती म्हणाली, " डोकं ताब्यांत ठेवून मला जातां यायचं नाहीं वन्सं. कृपा करून मला त्यांच्याजवळ नेऊन बसवून ये. "

मनांतल्या मनांत ती म्हणाली, ' देवा हातींचा चुडा अजूनपर्यंत कायम राखलास—खरंखोटं कसाला लावून उगीच माझं सौभाग्य हिरावून घेऊं नकोस. जी कांहीं शिक्षा मला व्हायची ती सारी मी माथीं वाहीन. पण एवढंच कर देवा,

जी कांहीं कठोर शिक्षा द्यायची असेल ती हंसतमुखानं सोसायची शक्ति मला दे. अशावेळीं मला मार्गभ्रष्ट होऊं देऊं नकोस.'

नवऱ्याच्या खोलींत प्रवेश केला तेव्हां कांहीं केल्या कमलेला आपलं मन शांत ठेवतां येईना. दोन दिवसांच्या उपासानं थकलेला देह आणि त्याहीपेक्षां दुबळा झालेला मेंदू भिरभिरला आणि ती नवऱ्याच्या पायतळीं कोसळून पडली.

काशीनाथ जागा होता. बिछान्यावर आपल्या पायाजवळ कोणीतरी पडल्याचं त्याला कळून आलं, पण मान वर करून पहाणं त्याला साध्य नव्हतं. त्यानं विचारलं, " कोण, बिंदू ? "

बिंदू म्हणाली, " नाहीं दादा—वहिनी ! "

" कमल ? तूं इथं कां ? "

उत्तर बिंदूनं दिलं. त्याच्या उशाशीं बसून ती अगदीं हळुच म्हणाली, " सावरतां आलं नाहीं--चक्कर आली आणि पडली आहे ती दादा ! "

काशीनाथ उगीच राहिला. ब्रिंदू म्हणाली, " आज रात्रीं तरी येऊं नकोस असं मी म्हणत होतें. दोन दिवसांनंतर आज ही शुद्धीवर आली. इथं आली तर डोकं ताब्यांत ठेवतां यायचं नाहीं हें मला पक्कं माहित होतं. "

नवऱ्याच्या दोन्हीं पावलांत तोंड खुपसून कमला मुकाट्यानं पडली होती. तिच्या डोळ्यांतून ओघळणाऱ्या आसवांच्या धारा

काशीनाथच्या गारठलेल्या पायांना चटका देत होत्या. ती जाणीव येऊन तो म्हणाला, " खरं आहे ताई, आली नसती तर बरं झालं असतं. "

कमलेकडे पहात असतांना बिंदूच्या डोळ्यांतून आसवं घळघळ वहात होतीं. पदरानं डोळे पुसून ती म्हणाली, " हें पटेल का कुणाला दादा ? तूं आतां बरा होत आलास, पण हे दोन दिवस वहिनीनं कशाप्रकारें काढले हें एक मला ठाऊक कीं त्या भगवंताला ठाऊक—तिला स्वतःला सुद्धां ठाऊक नसेल ! "

भगवंताचं नांव कानीं येतांच काशीनाथनं डोळे मिटले. बाहेरची दृष्टी एका क्षणांत अंतर्मुख झाली आणि अंतःकरणाचा ठाव घेऊं लागली. साऱ्या विश्वांतल्या स्त्री-पुरुषांच्या अंतरंगांत जो चिरकाल अधिष्ठित होऊन बसला आहे त्याच्या चरण-कमलीं त्यानं कौल मागितला—उत्तरासाठीं घटकाभर वाट पाहिली—त्यानंतर डोळे उघडून तो म्हणाला, " आतां मी मरायची भीति नको कमला. उठून बैस. "

बिंदू म्हणाली, " दादा, मला कांहीं विचारीत होतास ना ? त्या प्रश्नाचं उत्तर देण्यासाठींच वहिनी तुझ्यापाशीं आली आहे. "

काशीनाथच्या पांढुरलेल्या ओठावर हास्याची रेषा उमटली. तो म्हणाला, " आतां कुणीच कसलं उत्तर द्यायची जरूर नाहीं बिंदू. दोन दिवस ही बेशुद्ध होऊन पडली होती यांतच

माझ्या साऱ्या प्रश्नांचीं उत्तरं मला पोहोंचलीं. " असं बोलून डाव्या हातावर भार देऊन काशीनाथ उठून बसला. मोठ्या कष्टानं आपला उजवा हात कमलेच्या मस्तकावर ठेवण्याचा प्रयत्न करीत तो उद्गारला, " कमल ! "

कमला बोलली नाहीं. त्याच्या दोन्हीं पावलांवर तशीच बळेंबळें तोंड दाबून धरून पडून राहिली—तिच्या दोन्हीं डोळ्यांतून आंसवें तशींच ओघळत होतीं.

बिंदू घाबरून म्हणाली, " तूं उठूं नकोस दादा. डॉक्टर म्हणत होते, जर पुनः—"

काशीनाथ हंसतमुखानं म्हणाला, " डॉक्टर काय वाटेल तें म्हणोत, पण ताई तुला सांगून ठेवतों, आतां मुळींच भिऊं नकोस. तुम्हीं दोघींनीं माझी मरणाची चिठ्ठी फिरवून टाकली आहे. "

कमलेच्या कोरडलेल्या केसांतून हात फिरवीत काशीनाथ कांहीं वेळ मुकाट्यानं हालचाल करायचा प्रयत्न करीत होता—पण पुनः तो तसाच पडून राहिला.

समाप्त